नव कोंकण प्रकाशन २

# पंचामृत

(ग्रंथालय विषयक व्याख्यानें व लेख)

एकमेव विक्रेते
ाहित्य सहकार संघ, लि०
खाडीलकर रोड, मुंबई ४

मूल्य २ रुपये

कुलाबा जिल्हा वाचनालय संघाचें प्रकाशन

# पंचामृत

प्राचीन पुस्तकालयें व अर्वाचीन ग्रंथालयें
प्रा नी. स ताकाखाव, M. A.

ग्रंथालय संघ व त्यांचे कार्य
श्री. र. श. पारखो

जिल्हा रायगड
श्री अ. का प्रियोळकर, B. A.

कुलाबा जिल्हा साहित्यिकांपुढील कार्य
श्री दि वि. काळे, M A.

आदर्श ग्रंथालयें
श्री. कृ. के राहाळकर,

विजया दशमी
१९५१

मूल्य २ रुपये

नव कोंकण प्रकाशन, अलिबाग.

# माननीय पंतप्रधान ना. बाळासाहेब खेर मुंबई संस्थान यांचे संदेश



## १ सार्वजनिक वाचनालय रौप्यमहोत्सव १९४६,

शालेय शिक्षणाला जर पावसाची उपमा दिली तर वाचनालयें हीं धरणाप्रमाणें आहेत. शाळांतील ज्ञान एका विशिष्ट वयांतच ग्रहण करावयाचें असते व तें अद्याप तरी सार्वत्रिक नाहीं पण धरणांत जतन करून ठेविलेल्या पाण्याप्रमाणें वाचनालयांतून मिळणारें ज्ञान सर्वगामी व सर्व व्यापी असतें वाचनालयाचा प्रसार व अभिवृद्धि हें एक लोक शिक्षणाचें व लोकसेवेचे थोर अंग आहे. आपल्या संस्थेस शुभेच्छा.

## २ कुलाबा जिल्हा वाचनालय परिषद्, गोरेगांव, १ लें अधिवेशन १९४७

वाचनालयें व ग्रंथालयें याच्या चळवळीचे लोण खेडोपाडीं पोहोंचविण्याचें प्रयत्न उत्साही मंडळी करीत आहेत, हें वाचून मला आनंद वाटला. साक्षरताप्रसाराचेंच साक्षरतासंवर्धन हें एक महत्त्वाचे अंग आहे व तें यशस्वी होण्यासाठीं वाचनालयें व ग्रंथालयें याचा फार मोठा उपयोग आहे. वाचनालयांचा खेड्यांत योग्य उपयोग होण्या-साठीं रिकामा वेळ व सोप्या व सहज समजणाऱ्या भाषेंत लिहिलेले, उत्सुकता निर्माण करणारें वाङ्मय, या गोष्टी अवश्य आहेत. खेड्यांतील या विशेष गरजा ध्यानांत घेऊन खेड्यातील ग्रंथालयें स्थापिली पाहिजेत. या दृष्टीनें ग्रंथालय चळवळीला जोड म्हणून फिरतीं वाचनालयें, सोपी व खेड्यांतील लोकांस रस वाटणाऱ्या विषयांवरील लेखन हीं उपांगें विचारणीय आहेत. या विषयाचा खोल अभ्यास असणाऱ्या विद्वानांकडून आपण यांची जास्त माहिती घेऊन योग्य ती योजना केली पाहिजे. आपल्या परिषदेंत याचा विचार होईल असा मला विश्वास आहे.



## मनोगत —

कुलाबा जिल्हा वाचनालय संघाचे प्रकाशन म्हणून 'पंचामृत' हें पुस्तक जनतेपुढें ठेवतांना मनास एक प्रकारचे विशेष समाधान वाटत आहे. वास्तविक हें कार्य यापूर्वीच व्हावयास पाहिजे होते. पण अनेक अडचणींतून तें हातावेगळे होण्यास एवढा काळ लागला ही गोष्ट खरी.

अलिबाग येथील सार्वजनिक वाचनालयाचा रौप्य-महोत्सव १९४६ च्या विजया-दशमीच्या दिवशीं मोठ्या उत्साहानें व थाटानें साजरा झाला. त्याप्रसंगीं प्रा. ताकाखाव आणि महाराष्ट्रातले ग्रंथालयशास्त्रतज्ञ श्री. पारखी हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. त्यांची भाषणें माहितीपूर्ण आणि मार्गदर्शक अशी होती. ही दोन्ही भाषणें छापून प्रसिद्ध करावी अशी इच्छा होती, पण वाचनालयाची सांपत्तिक परिस्थिती व इतर गरजा लक्षांत घेतां तो बेत रहित झाला. पुढें १९४७ च्या जानेवारींत गोरेगांव येथें पहिली जिल्हा वाचनालय परिषद आणि साहित्यिक परिषद भरली होती. त्यांच्या अध्यक्षपदारून अनुक्रमें श्री अ. का. प्रियोळकर B. A. आणि श्री. दि. वि. काळे M. A. यांनीं केलेली भाषणे हींपण महत्त्वाची झाली. जिल्हा वाचनालय संघ व जिल्हा साहित्यिक संघ या दोन्ही संस्था, सार्वजनिक वाचनालयाच्या रौप्य-महोत्सव प्रसंगींच स्थापन झाल्या त्यामुळें या सर्व संस्थाच्या मार्फत सर्वच व्याख्यानें छापून पुस्तकरुपानें प्रसिद्ध करावी असें वाचनालय संघानें ठरविलें. श्री प्रियोळकर यांचे भाषण हें अनेक दृष्टींनी फार महत्त्वाचें असे आहे. जिल्ह्यांतील जुनी वाचनालयें, जिल्ह्याचें ऐतिहासिक महत्त्व आणि वैशिष्ट्य याविषयीं संशोधनात्मक माहिती त्यांनीं सागितलीच, शिवाय जिल्ह्याला 'रायगड' हें नांव देणें कसें योग्य आहे याचाही उहापोह त्यात त्यांनीं केलेला आहे सदर भाषणाचा कांहीं भाग 'विविधवृत्त' साप्ताहिकांत प्रसिद्ध झाला होता. त्यानंतर तें भाषण छापून काढावे अशा अनेकाकडून सूचना आल्या होत्या. आज तो योग येत आहे

कांहीं गोष्टींचा येथे उल्लेख करावयास हवा आहे मुंबई संस्थानांत कुलाबा जिल्हा अनेक दृष्टीनी मागासलेला मानण्यांत येतो! परिस्थितीही, थोडी तशी आहे हें मान्य करण्यात कमीपणा नाहीं. पण माध्यमिक शिक्षण आणि वाचनालय-प्रसार-योजना यांत या जिल्ह्यानें केलेली कामगिरी अभिमानास्पद अशीच आहे. ग्रंथालय शास्त्राचे पदवीधर पहिल्यानें या जिल्ह्यांतीलच बहुसंख्य होते व ते आज महाराष्ट्रांत प्रमुख ठिकाणीं कार्य करीत आहेत. त्यांचा उल्लेख श्री. प्रियोळकर यांच्या भाषणांत आलेला आहेच. आणखी एका गृहस्थांचा उल्लेख करावयास हवा. बडोद्याचे लोकप्रिय आणि राजकार्य धुरंधर अधिपती श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं बडोदे संस्थानांत ग्रंथालयाचे नमुनेदार

कार्य सुरू केले होते. तेथील ग्रंथालयातर्फे सुरवातीलाच ग्रंथालयशास्त्राचें शिक्षण देण्याचा उपक्रम झाला. पेण येथील एक रहिवासी श्री. दादासाहेब लिमये, B. A. हे त्या वर्गाचे त्या काळांतील पदवीधर आहेत. त्यांच्या ज्ञानाचा लाभ पेण येथील त्या वेळच्या ग्रंथालयास मिळाला. ग्रंथालय चळवळीशी या जिल्ह्याचा संबंध असा पूर्वापार आहे.

शालेय ग्रंथालयाबाबतही या जिल्ह्यांतील २–३ उपक्रम उल्लेखनीय आहेत. हायस्कूलधील नमुनेदार शिक्षक ग्रथालय व विद्यार्थी ग्रंथालय कसें असावे याचे अनुकरणीय उदाहरण रोहें येथील मेहेंदळें हायस्कूलनें घालून दिलें. त्या हायस्कूलचे त्या वेळचे प्रमुखाध्यापक गु. गं. गो. कुटे B. A. B T. यांनाच त्याचे संपूर्ण श्रेय द्यावे लागेल. ते स्वतः साहित्यिक वृत्तीचे, वाचनप्रेमी व शिक्षणतज्ञ असल्यामुळें त्यांत त्यांनीं आत्मीयतेनें लक्ष घातले. दुसरा प्रयत्न महाड येथील हायस्कूलचे उत्साही व कार्यदक्ष प्रमुखाध्यापक श्र. वि. त्र्यं. चांदे B. A यांचा आहे. सुसज्ज व संपन्न असे विद्यार्थी–वाचनालय त्यांनीं आपल्या हायस्कूलमध्यें निर्माण केले आहे. शाळेतर्फे अनेक शिक्षकांना ग्रंथपालन वर्गास पाठवून त्यांनीं तें वाचनालय आदर्श असें बनविले आहे. माध्यमिक शाळांनीं अनुकरणीय असें हें कार्य आहे श्री. चांदे यांचे गृह–ग्रंथालयही नमुनेदार आहे.

आणखी एका लहानशा प्रयोगाचा उल्लेख करणें आवश्यक आहे. महाड तालुक्यांतील धामणें या गावी निघालेले विद्यार्थी वाचनालय छोटे असलें तरी विद्यार्थ्यास मासिक एक पैसा व इतरांस एक आणा या वर्गणींत पुस्तकें, वर्तमानपत्रें वाचावयास देण्याचा उपक्रम खरोखर कौतुकास्पद होय. १९४६ सालांतील हा उल्लेख आहे. त्यावेळीं हें कार्य श्री चं. वि गडकरी या उत्साही शिक्षकानी व कार्यवाह न. वा. पवार यांनीं सुरू केले आज त्याची काय स्थिती आहे याची कल्पना नाही ! पण आरंभीचा प्रयत्न अनुकरणात्मक व उपयुक्त खास आहे.

कुलाबा जिल्हा वाचनालय संघाची माहिती परिशिष्टांत दिली आहेच. 'राष्ट्रतेज' मुद्रणालयानें सवलतीनें 'पंचामृत' छापून दिल्याबद्दल आभार. इतर अनेक सहकाऱ्यांचे सहाय्य झाले आहेच. आभार मानून त्यांच्या ऋणांतून मुक्त होण्यापेक्षा ऋणांत राहाणेंच श्रेयस्कर !

काहीशा– नव्हे बऱ्याच–उशिरा आपल्या सेवेस सादर केलेले 'पंचामृत' गोड मानून घ्यावे हीच नम्र विनंती.

अलिबाग ९–१०–५१ कृ. के. राहाळकर
विजयादशमी

# प्राचीन पुस्तकालयें व अर्वाचीन वाचनालयें

## ( ग्रंथालयांचा इतिहास )

प्रा. नी. स. ताकाखाव, M. A. मुंबई

[ अलिबाग येथील सार्वजनिक वाचनालयाच्या रौप्यमहोत्सव प्रसंगी ( ता. ५ ऑक्टोबर १९४६ विजयादशमी ) केलेले अध्यक्षीय भाषण. ]

ह्या वाचनालयाचे आश्रयदाते व अध्यक्ष व इतर कार्यवाहक मंडळी ह्यांचें मला पहिल्या प्रथम अभिनंदन केलें पाहिजे. हें वाचनालय आज पंचवीस तीस वर्षे चालू काहे व केवळ जागतिक युद्धाच्या बिकट परिस्थितीमुळेंच आजचा हा रौप्य-महोत्सव लांबणीवर पडला आहे आज आपल्या देशामध्यें मोठमोठ्या जिल्ह्यांच्या व तालु-क्यांच्या शहरांत असलीं सार्वजनिक वाचनालयायें क्वचितच पाहण्यास मिळतात; किंबहुना सार्वजनिक वाचनालय ही चीज काय आहे ह्याची कल्पनाही शेंदिडशें वर्षांमागें हिंदुस्थान देशांत होती किंवा नाहीं हा प्रश्न विचारण्यासारखा आहे. पाश्चिमात्य देशांत ह्या पुस्त-कालयांच्या व्यवस्थेविषयीं शतकानुशतकें जी आस्था दाखविण्यांत येत आहे, त्या मानानें आपणा हिंदुस्थानवासी जनतेला लज्जेनें डोकें खाली घालण्यावांचून इलाज नाहीं. आपल्या देशावर पाश्चिमात्य राष्ट्रांची सत्ता प्रस्थापित झाली तेव्हां, व विशेषतः मुंबई मद्राससारख्या विश्वविद्यालयांची स्थापना झाल्यावर सार्वजनिक वाचनालयांसंबंधानें आपल्या देशांत पुसट कल्पना उदित होवूं लागली. पहिल्या प्रथम कलकत्ता शहरीं व नंतर मुंबई शहरीं रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखांची स्थापना झाली, व शाखेप्रित्यर्थ प्रथम सभासद मंडळींच्या व नंतर इतर वर्गणीदारांच्या उपयोगार्थ पुस्तकालयांची योजना होवूं लागली. कालांतरानें मुंबई पुण्यासारख्या मोठमोठ्या शहरांत " नेटिव जनरल लायब्ररी " म्हणून संबोधल्या जाणाऱ्या पुस्तकालयांची स्थापना होवूं लागली त्या वेळेस 'नेटिव' शब्दावर आपल्या युरोपीयन मित्रांचा फार कटाक्ष होता. ' नेटिवां " च्या कल्याणासाठीं वाचना-संबंधानें अभिरुची उत्पन्न करणें व वाचनालयांची स्थापना निदान जिल्हा शहरांत करणें हा आपल्या युरोपीयन राजकर्त्यांचा एक संकल्प होवून गेला, व लार्ड विल्यम बेंटिक व त्यांचे Law Member लॉर्ड मेकॉले ह्यांच्या वेळेपासून पाश्चात्य विद्याप्रसाराचे कार्य झपाट्यानें होवूं लागले. तेव्हां ग्रंथ व ग्रंथालयें ह्या संबंधानें देशांत विशेष जागृति होवूं लागली. पांच सहा वर्षांमागें नाशिक येथील जुन्या

"नेटिव जनरल लायब्ररी" नें आपला शतसांवत्सरिक समारंभ साजरा केला. तें पुस्तकालय जवळ जवळ १८४० सालीं प्रस्थापित झालें. शंभर वर्षांच्या मानानें ह्या पुस्तकालयाचा विशेष उत्कर्ष झाला आहे असें मला वाटत नाहीं. कारण तेथील बहुतेक पुस्तकें जीर्ण व चोपडीवजा आहेत. पुस्तकांची कपाटें तर अधिक जीर्ण आहेत, व संस्थेला स्वतःची इमारतही नाहीं. एका पेशवाई थाटाच्या जीर्ण मंदिरांत एका वरच्या मजल्यावर ह्या ग्रंथालयाचा संसार चालू आहे व खालच्या मजल्यावर शहर पोलीस खात्याची कचेरी आहे, जणूं कांहीं ही पोलीस मंडळी लायब्ररींत कोण येतें, कोण जातें ह्या विषयीं डोळ्यांत तेल घालून पाहारा करीत आहे! ह्या दृष्टीनें विचार केला असतां आपल्या अलिबागच्या नगरवासियांनां आपल्या ह्या सार्वजनिक पुस्तकालयासंबंधीं सार्थ अभिमान वाटला पाहिजे, व म्हणूनच ह्या संस्थेचें आश्रयदाते व हितचिंतक व कार्यकारी मंडळीचें अभिनंदन केलें पाहिजे

पुस्तकालयांचे अनेक प्रकार आहेत, परंतु मुख्य दोन म्हणजे खाजगी व सार्वजनिक युरोपखंडांत पंधराव्या व सोळाव्या शतकांत, "रेनेसान्स" [Renaissance अथवा Renaseence] ह्या नावानें उल्लेखिलेली जी नाना कला-शास्त्र-विद्यांची अभिरुची उत्पन्न करणारी जागृती झाली, त्या वेळेस तर विशेषतः युरोपखंडांतील मोठमोठ्या नगरपालिकांनीं सार्वजनिकरीतीनें मोठमोठे म्युझियम्स, पिक्चर गॅलरीज व वाचनालयांचें उद्घाटन करण्याचा जणू कांहीं विडाच उचलला होता परंतू Renaissance कालाच्या अगोदरही इंग्लंड देशांत, त्याचप्रमाणें सर्व पाश्चिमात्य देशांत, धर्मग्रंथांच्या पुस्तकालयांची प्रस्थापना जोरांत चालू होती. खुद्द इंग्लंड देशांत यॉर्क, कँटरबरी, डरहॅम डोव्हर, व्हिटबी, ऑक्सफर्ड, ग्लॅस्टनबरीसारख्या प्राचीन शहरांतील monasteries किंवा धर्ममठ संस्थांना जोडून असल्या पुस्तकालयांची निपज ठिकठिकाणी झालेली होती. आठव्या हेनरीच्या कारकीर्दीत जेव्हां ह्या मठसंस्थांचा नाश करण्यांत आला, तेव्हां ही पुस्तकालयेंही बरीचशी रसातळास गेली. ऑक्सफर्ड विश्वविद्यालयाची ड्यूक हमफ्रीज लायब्ररी [Duke Humphrey's Library] ही त्यावेळेस बहुतेक नष्टप्राय झाली, मात्र तिची प्राचीन इमारत केवळ अवशिष्ट म्हणून राहिली व त्याच इमारतीमध्यें इ. स. १६०४ सालीं सर टॉमस बॉडली (Sir Thomas Bodley) ह्यानें बॉडलीयन लायब्ररी [Bodleian Library] ह्या नावानें सर्वश्रुत असलेल्या पुस्तकालयाची पुर्नस्थापना केली. त्याचप्रमाणें केंब्रिजचें विश्वविद्यालय, ट्रिनिटी

कॉलेज ( डब्लिन ), ॲबरडीन, एडिनबरो, ग्लासगो [ Glasgow ] व सेंट अँड्रूज [ st. Andrews ] येथील सार्वजनिक पुस्तकालयांची स्थापना बहुधा Bodleian Library च्या स्थापनेच्या अगोदरच झालेली दिसते. अखिल जगतांत सर्वांत मोठें पुस्तकालय म्हणजे Library of the British Museum [ ब्रिटिश म्युझिअमचें पुस्तकालय ] ह्या पुस्तकालयाची स्थापना १७५३ पर्यंत झालेली नव्हती,— म्हणजे क्लाईव्हनें जिंकलेली प्लासी [ Plassey ] ची लढाई व ब्रिटिश म्युझियमची ग्रंथ भांडाराची स्थापना ह्यांचा काल जवळ जवळ येतो. सर हॅन्स स्लोन [ Sir Hans Sloane ] नांवाच्या उदारधी पुरुषानें आपल्या खाजगी द्रव्यनिधीच्या बळावर ह्या जागतिक पुस्तकालयाची स्थापना केली, व नंतर कांहीं कालांतरानें इंग्लंडच्या राज्य घराण्याच्या पुस्तकालयाचा त्याच ग्रंथभांडारांत समावेश होऊन ब्रिटिश म्युझिअम पुस्तकालय एवढ्या महत्पदास चढलें. अठराव्या शतकांत विलायतेंतील Royal Library ( म्हणजे राजघराण्याचें पुस्तकालय ) ही प्रायः खासगी स्वरुपाची संस्था होती व त्यांत बऱ्याच दुर्भिळ ग्रंथांचा संग्रह होता. तरी पण मोठमोठ्या विद्वान पंडितांना त्या खासगी ग्रंथसंग्रहालयाचा उपयोग करून घेण्याचा परवाना मिळत असे. प्रख्यात डॉ जॉनसन [ Dr. Johnson ] आपल्या सुप्रसिद्ध शद्बकोशाचें [ First Dictionray of the English Language ] काम करीत असतांना ह्या ग्रंथालयाचा उपयोग करीत असे. डॉ. जॉनसन ह्या रीतीनें Royal Library मधील ग्रंथांचें परिशीलन करीत असतां इंग्लंडचा तिसरा जॉर्ज [ King George III ] व जॉनसनची तेथें भेट होवून त्या महापंडिताचा तिसऱ्या जॉर्जनें सत्कार केला ह्याचें मनोरंजक व गौरवयुक्त वर्णन बॉस्वेल [ Boswell ] नें आपल्या चरित्र ग्रंथांत दिलें आहे. इंग्लंडमध्यें प्रसिद्ध झालेल्या प्रत्येक ग्रंथाची एक प्रत ब्रिटिश म्युझिअमच्या ग्रंथसंग्रहास अर्पण केलीच पाहिजे असा प्रत्येक प्रकाशक [ Publisher ] कंपनींवर कायद्याचा सक्त नियम आहे. त्याचप्रमाणें पब्लिशिंग कंपनी [ Publishing Companies ] जे जे नवीन ग्रंथ प्रसिद्ध करतील त्यांची एक एक प्रत बिनामूल्य बाटल्यास मागून घेण्याचा विलायतेंतील कित्येक सार्वजनिक ग्रंथालयांस अधिकार देण्यांत आला आहे. असा अधिकार, तेव्हां असलेलीं ग्रंथ भांडारें म्हणजे ऑक्सफर्डची बॉडलीयन लायब्ररी, केंब्रिज व डब्लिन विश्वविद्यालयांची पुस्तकालयें, एडिनबरो येथील वकील मंडळाचें पुस्तकालय [ Library of the Faculty of Advocates of Scotland ], वेल्स [ Wales ] येथील नॅशनल

लायब्ररी [ The National Library of Wales at Aberystwyth ] ह्या संस्थांना पार्लमेंटकडून मिळालेला आहे वर उल्लेखिलेल्या एडिनबरो [ Edinburgh ] च्या वकील मंडळाच्या पुस्तकालयाचा प्रारंभ १६८२ सालीं झाला Wales व Dublin येथील ग्रंथालयें अगदीं आधुनिक कालांतल्या आहेत. पैकीं Wales च्या नॅशनल लायब्ररींत प्राचीन वेल्श भाषेंतील दुर्मिळ ग्रंथांचा व हस्तलिखितांचा मोठा संग्रह आहे.

इंग्लंड येथील स्थानिक नगरपालिकांना पुस्तकालयें स्थापून त्यांस वार्षिक खर्चाच्या निधी साठीं १८५० सालच्या एका कायद्यानें ब्रिटिश पार्लमेंटनें स्वतंत्र कर बसविण्याचा अधिकार दिला आहे. युरोपखंडांतील फ्लॉरेन्स, व्हेनिस, मिल्यान [ Milan ] ब्रुजेस, [ Bruges ] अँटवर्प, घेट, [ Ghent ] वगैरे शहरीं हेच काम तेथील नगरपालिकांकडून जादा कर वसुलीशिवाय करण्यांत येत होतें. युरोपांतील कॅथॉलिक सांप्रदयाचें श्रेष्ट धर्मगुरू पोप [ Pope ] ह्यांची व्हॅटिकन [ Vatican ] लायब्ररी फार प्राचीन असून त्यांत दुर्मिळ ग्रंथांचा मोठा संग्रह आहे, व मुळची ती जरी खाजगी लायब्ररी असली तर आजमितीला मोठया सार्वजनिक पुस्तकालयाप्रमाणें तिचा उपयोग होत आहे.

पुस्तकालयांच्या व्यवस्थेंत व विविधतेंत आज मितीस बरेच नवीन प्रकार व नवीन रचना अमलांत आल्या आहेत, तरी पुस्तकालयें हीं फार प्राचीन काळापासून चालत आली आहेत. अगदीं प्राचीन काळीं पुस्तकालयें म्हणजे रेकॉर्ड ऑफिसीस अशींच होती व त्यांत धार्मिक व राजकीय स्वरुपांच्या ग्रंथांचा व लिखितांचा संग्रह असे. अलिकडे प्राचीन बाबिलोनिया व असिरीया देशांत पुराणवस्तु संशोधन खात्याकडून शोध लागले आहेत कीं सुमेरियन ( Sumerian ) नांवाचा जो प्राचीन मानव वंश बाबिलॉन येथें ख्रिस्त शकापूर्वी ३–४ हजार वर्षांपूर्वी विद्यमान होता, त्यांनीं भाजलेल्या विटांवर पुस्तक लेखन करण्याचा प्रचार पाडला, व तेव्हांच्या पुस्तकालयांतील प्रत्येक पुस्तकांतील एक एक पान म्हणजे भाजलेली वीट – कीं जिच्यावर सांकेतिक अक्षरांनीं लिखाण केलें आहे अशी वीट व पुस्तक म्हणजे अशा विटांचा एका फडताळांत ठेवलेल्या समुच्चय, व पुस्तकालय म्हणजे अशा समुच्चयांचा समुच्चय-बाबिलॉन देशाच्या प्रत्येक मोठया नगरांत अशा प्रकारचे ग्रंथ समुच्चय होते. ख्रिस्त शकापूर्वी साधारणपणें १८०० वर्षांमागें तेथील अक्कड [ AKKAD ] शहरांतील

पहिला सार्गोन [Sargon I] नांवाच्या राजानें अशीच एक थोरली लायब्ररी निर्माण केली होती. विषयवारीप्रमाणें निरनिराळ्या ग्रंथांच्या निरनिराळ्या पानांच्या विटा मल्या मोठ्या दालनांतून निरनिराळ्या फडताळांतून रचून ठेविल्या असत व हें काम अर्थात मोठें खर्चाचें होतें. पुष्कळ पंडित मंडळी केवळ असल्या विटकरी ग्रंथांच्या निरनिराळ्या प्रती करण्यांत गुंतलेली असे अशा प्रकारचे आज तागायत २५ हजार विटकरी लेख सांपडले आहेत. ख्रिस्तपूर्वी सुमारें ६५० वर्षांपूर्वी निनव्हे [Nineveh] शहरांतील असूर बनी पाल [Assur bani-pal] नामक राजाचें वीटबंध ग्रंथांचें पुस्तकालय लायर्ड [Layord] नांवाच्या 'पुराणवस्तू संशोधकाला १८५० सालीं सापडले. त्यांत इतिहास, ज्योतिष, व्याकरण, स्तोत्रें, दंतकथा, भविष्यकथा वगैरे विषयांवरील भाजलेल्या विटांवर लिखित केलेले ग्रंथ सापडलें, त्यापैकीं कांहींचीं स्थापना सध्यां ब्रिटीश म्युझिअमच्या ग्रंथालयांत करण्यांत आलेली आहे.

ईजिप्त देशांत धार्मिक, ऐतिहासिक, औषधीक, शास्त्रीय विषयांवर अनेकविध ग्रंथ पापीरस नांवाच्या कागदावर लिहिण्याचा प्रघात फार प्राचीन काळापासून होता, व तशा प्रकारची ग्रंथालयें फार प्राचीन कालापासून चालत आली होती. आपण हिंदुस्थानांत जन्मपत्रिकांचे "रोल" केलेले केव्हां केव्हां पाहतो तो प्रकार या ईजिप्तमधील पापीरसच्या Rolls पासून चालत आला आहे. प्राचीन ग्रीस व रोम येथेंही ग्रंथ अशाच रीतीनें लिहिले जात. एक एक पापीरस कागदावरील लेख संपूर्ण झाला म्हणजे एकाखालीं एक चिकटवून त्या सर्वांचे गुंडाळें करीत. असे एक गुंडाळें म्हणजे एक पुस्तक, अशा प्रकारचें एक एक गुंडाळ्याचें पुस्तक पितळेच्या स्वतंत्र डब्यांत ठेविलें जाई; त्या डब्याला clasp किंवा एक प्रकारचें कुलुप असावयाचें, व अशा प्रकारच्या डब्यांचा संग्रह म्हणजेच तेव्हांचीं पुस्तकालयें! सर्वांत प्रख्यात असें हें पितळी डब्यांचें आंत papyrus कागदावर लिहिलेल्या पानांचे गुंडाळें असणारें पुस्तकालय ख्रिस्त शकापूर्वी तीस वर्षांच्या सुमारास रोम नगरीचा पहिला बादशहा ऑगस्टस सीझर यानें आपल्या पॅल्याटिन टेकडीवरील राजवाड्यांत स्थापिलें व त्या संग्रहालयाचा उपयोग रोम शहरांतील कोणाही पंडिताला किंवा कवीला किंवा इतिहासलेखकाला करितां येत होता. त्यापूर्वी अलेक्झांड्रिया शहराचें सार्वजनिक पुस्तकालय टॉलेमी वंशांतील राजपुरुषांनीं स्थापिलें, व तें अखंड युरोप खंडांत प्रसिद्ध होतें. मध्ययुगीन युरोप खंडांतही पुस्तकें म्हणजे अशा प्रकारचीं गुंडाळें किंवा रोल्स असत व म्हणूनच न्यायालयांतील ग्रंथ व रेकार्डस् यांचा हवाला असलेल्या अधिकाऱ्याला 'मास्टर ऑफ दि रोल्स' असें नामाभिधान होतें.

ग्रीस देशांतील अशा पुष्कळ ग्रंथांचा नाश झाला. कांहीं ग्रीक ग्रंथ इराणचा बादशहा क्षेरक्षेस ऊर्फ शेरशाह ह्यानें आपल्या देशी नेलें, प्रख्यात तत्ववेत्ता आरिस्टॉटल ह्याचे खासगी पुस्तकालय अनेक स्थित्यंतरानंतर रोम शहरीं ख्रिस्त शकापूर्वी ब्यायशीं सालच्या सुमारास नेण्यांत आलें. त्यापूर्वी मॅसेडोनियांच्या राजघराण्याचा पुस्तक संग्रहही रोम शहरी नेण्यांत आला; परंतु गॉथ, हूण, वगैरे रानटी लोकांनीं रोमन राज्यांत आपला शिरकाव केला, तेव्हां बहुतेक सर्व ग्रंथ व पुस्तकालयें नाश पावली. ह्या रानटीं लोकांतही भूर्जपत्रांवर लेख लिहिण्याची पद्धत होती. बीच नांवाच्या वृक्षाच्या सालीवर ते आपले लेख लिहीत. इंग्रजी शब्द book हा beech शब्दापासून निघाला आहे. Book म्हणजे ॲंग्लो सॅक्सन Bok. किंवा beech भूर्ज.

इंग्लंड देशांत सार्वजनिक पुस्तकालयांसंबंधानें बरेच कायदे पास केलें आहेत. पैकीं बहुतेक कायद्यांअन्वयें एक आणा (वन् पेनी) वर्गणी दरमहा वाचकांकडून वसूल करण्याची नगरपालिकांना सवलत होती; परंतु १९१९ सालच्या एका कायद्याअन्वयें (पब्लीक लायब्ररीज ॲक्ट १९१९) ही वर्गणी काढण्यांत येऊन नगरपालिकांना मोफत वाचनालयें चालविण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे, व तो अधिकार योग्यरीतीनें बजावण्यांत येत आहे. शेतकरी वर्गाच्या गांवीं देखील अशी पुस्तकालयें स्थापण्यांत आलीं आहेत.

ॲंड्रू कार्नेजी नावांच्या स्कॉटिश वंशांत जन्मलेल्या एका अमेरिकन कोट्याधिशानें इंग्लंड, स्कॉटलंड, अमेरिका वगैरे देशांतील निरनिराळ्या शहरांत अशा तऱ्हेची मोफत वाचनालयें स्थापण्यासाठीं आपलें कोट्यावधी डॉलरांचें द्रव्य खर्च केलें. इंग्लंड, कानडा, युनायटेड स्टेटस वगैरे देशांत हा "पब्लिक लायब्ररी" प्रचार पब्लिक एज्यूकेशन खात्याशीं संलग्न आहे. परंतु नगरपालिकांनीं मोफत वाचनालयें, ठेवावीं की नाही, हें त्यांच्या स्वेच्छेवर अवलंबून आहे. ही स्वेच्छेची बाब काढून टाकावी व सार्वजनिक वाचनालयें राखणें ही गोष्ट नगरपालिकांच्या आवश्यक कार्यांच्या क्षेत्रांत यावी, एतदर्थ बरीच वाटाघाट तेथें सध्यां चालू आहे. फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया वगैरे देशांत मध्ययुगीन कालापासून मोठमोठी संग्रहालयें सुस्थितींत आहेत.

पॅरीस येथील Bibliotheque Nationale ही सर्वोत्कृष्ट अशी एक संस्था आहे जगांतील सर्वमान्य व सर्वोत्कृष्ट अशा जी दोन तीन पुस्तकालयें आहेत त्यांमध्यें ह्या फ्रेंच राष्ट्रीय पुस्तकालयाची गणन होते बर्लिन येथें बादशाही पुस्तकालयाची (इंपीरिअल लायब्ररीची) स्थापना १६५९ साली झाली. ज्यांत साठ लाखांपर्यंत ग्रंथांची संख्या राहूं शकेल, अशा पुष्कळ मोठया इमारतीच्या इमारती ह्या संग्रहानें भरलेल्या आहेत. ह्याच्या खालोखाल व्हीयेन्ना व बुडापेस्ट येथील सार्वजनिक पुस्तकालयांचा नंबर लागतो. स्पेन व पोर्चुगाल येथेंही मोठया सार्वजनिक पुस्तकालय संस्था आहेत; परंतु तेथील नगरपालिकांकडून हें काम योग्य रीतीनें होत नाहीं व ते देश आज मागासलेले आहेत.

हिंदुस्थानांत गायकवाड सरकारनें बडोदें संस्थानांत सार्वजनिक पुस्तकालयांचा बराच प्रसार केला. तेथें प्रत्येक खेडेगांवातून फिरवितां यावें असें ,फिरतें ग्रंथसंग्रह निर्माण करण्यांत आले आहेत ते एका गांवांतून दुसऱ्या गांवांत अशा रीतीनें फिरते असतात. पण त्यांच्या फिरण्याच्या गतीचें धोरण बडोदें येथील मध्यवर्ती सार्वजनिक पुस्तकालयांच्या अधिकाऱ्यांच्या नियंत्रणाखालीं असतें. अशा प्रकारच्या सार्वजनिक पुस्तकालयांची रचना अलिकडील प्रांतिक राष्ट्रीय सरकारकडून आपापल्या प्रांतांत आंखली जाईल. असें मानावयास अलिकडे बराच विश्वास वाटतो. परंतु येथील नगरपालिकांकडून ह्या बाबतीत कांहींच विचार होत नाहीं. स्वतःची पुस्तकालयें तर ह्या संस्था बिलकूल काढीत नाहींत, पण स्वतंत्रपणें आपल्या शहरांत स्थापन झालेल्या पुस्तकालयांना व्हावी इतकी कांहीच मदत त्यांच्याकडून होत नाहीं, व अल्पस्वल्प अशा पुस्तकालयांसाठीं त्यांच्याकडून कांहीं वार्षिक ग्रँट मुकर झाली, तर ती जड अंतःकरणानें देण्यांत येते! विलायतप्रमाणें येथील नगरपालिकांना जादा कर बसविण्याची सवलत मिळाल्याशिवाय ह्या वृत्तींत कांहीं सुधारणा होईल, असें मला वाटत नाहीं.

अलिबाग येथील सार्वजनिक वाचनालय हें ह्या शहराला मोठें भूषण आहे, व निदान ह्या संस्थेला येथील म्युनिसिपल कमिटीकडून सढळ हातानं वार्षिक ग्रँट मिळेल व ती उत्तरोत्तर वाढत जाईल. अशी मला फार आशा आहे.

१८७७ सालीं लायब्ररी असोशिएशन नांवाची एक संस्था इंग्लंड देशांत निर्माण झाली. ह्या संस्थेचे आज साधारण आठशें सभासद आहेत व हे सर्व सभासद स्वतः निरनिराळया पुस्तकालयांचे व्यवस्थापक आहेत. ह्या संस्थेमार्फत पुस्तकांचें वर्गीकरण, ग्रंथांच्या निरनिराळ्या आवृत्त्यांसंबंधी टांचणें व पुस्तकालय व्यवस्थेच्या अनेक बाबींसंबंधानें सांगोपांग विचार केला जातो. पुस्तकालय व्यवस्थापकांना शिक्षण देण्याचेंही कार्य ह्या संस्थेच्या विद्यमानें केलें जातें. योग्य प्रकारच्या पुस्तकालय व्यवस्थापकांची संख्या वाढावी एतदर्थ मुंबईच्या विश्वविद्यालयानेंही एक वर्ग चालविला आहे. निरनिराळ्या देशांतही असलीं लायब्ररी असोशिएशन्स स्थापन झालीं आहेत व त्यांच्याकडून पुस्तकालयांच्या व्यवस्थेसंबंधानें उहापोह करणारीं मासिकें व वार्षिक हकीगत पत्रकें (इअर–बुक्स) प्रसिद्ध होत आहेत.

पुस्तकें अधिक काळपर्यंत टिकण्यासाठीं वरील देशांत काय इलाज केलें जातात त्यांचा थोडक्यांत येथें उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं; परंतु त्याहूनही अधिक महत्त्वाची बाब म्हणजे पुस्तकांचें वर्गीकरण, सूचीपत्रें किंवा इंडेक्स, पुस्तकें "इश्शू" करण्याच्या देण्याच्या कार्ड सिस्टीम वगैरे पद्धती त्यांचाच उल्लेख केला पाहिजे, केरोसिन तेल, पेट्रोल, व कापूर ह्यांचें मिश्रण करून पुस्तकांच्या बाह्य वेष्टनास लाविल्यानें पुस्तकें अधिक वेळ टिकतात. सगळ्यांत कमी खर्चाचा इलाज म्हणजे नॅफथालाईन गोळ्यांचा उपयोग करणें हें होय, परंतु आतां ही एक गोष्ट निर्विवाद झाली आहे कीं, पुस्तकें दीर्घ काळ टिकविण्याची असतील, तर पुस्तकांना प्रकाश व खेळतां वारा (व्हेंटिलेशन) ह्यांची फार जरूरी आहे. युरोपमधील मोठमोठया ग्रंथ संग्रहालयांतून जेव्हां जेव्हां हवा कोंदट व ओलसर होतें, तेव्हां पुस्तकांच्या कपाटाच्या आंत इलेक्ट्रीक दिवे लावून कपाटांत ऊष्णता वाढविण्याचें प्रयत्न केले जातात त्याचप्रमाणें व्हेंटिलेशनसाठीं पुस्तकांच्या कपाटांत विजेचे पंखेही चालू ठेवलेले असतात अशा प्रकारचे इलाज अलिबाग शहरीं शक्य नाहींत, कारण येथें इलेक्ट्रिसिटी नाहीं; तरी वेळोवेळीं पुस्तकें उन्हांत ठेवणें व त्यांना कोरड्या हवेचा कांहीं तरी लाभ देणें इतकें तरी शक्य आहे. पुस्तकांची कपाटें वेळोवेळीं साफ केली पाहिजेत. लांकडी कपाटापेक्षां तीन बाजूनें कांचेनें मढविलेलीं स्टीलचीं कपाटें पुस्तकांच्या आयुर्मर्यादेच्या दृष्टीनें अधिक फायद्याची ठरतील.

सर्वांत मोठें शत्रू म्हणजे वाळवी व कसर (बुकवर्म) मुंबईस पुष्कळ पुस्तकें 'बुकवर्म' नें पीडलेलीं दिसतात. मुंबई बाहेर वाळवीची भीति तर अधिकच आहे. निदान वर्षाऋतूंच्या अखेरीस पुस्तकांना वाळवीची व कसरीची फार भीति असतें,

तेव्हां फार काळजी घेतली पाहिजे व उन्हाळ्यांत पुस्तकांची नीट उलथापालथ करून त्यांना उन्हाचा थोडा प्रसाद दिला पाहिजे. ज्या पुस्तकांना वाळवी किंवा कसर लागलेली आहे, अशीं पुस्तकें निराळ्या कपाटांत ठेवून तीं इतर कपाटांपासून दूर ठेवली पाहिजेत. शिवाय त्यांना केरोसिन पेट्रोलचा माराही बराच दिला पाहिजे.

पुस्तकालयासंबंधानें मला जें कांहीं सांगावयाचें होतें, तें आपणांस सांगितलें. मीं कांहीं कोणत्याही पुस्तकालयाचा व्यवस्थापक किंवा कर्ता पुरुष नाहीं; व मला ह्या संबंधानें अधिकारवाणीनें बोलतां येत नाहीं. साधारण जातीच्या पुस्तकालयानीं पुस्तकांच्या ज्या निरनिळया मालिका आहेत त्यांचा भरणा करावा. प्रसिद्ध ग्रंथकर्ता कार्लाईल ह्यानें म्हटलें कीं, 'भविष्य कालचीं विश्वविद्यालयें म्हणजे ग्रंथालयें हींच होत.' रस्किननें आपल्या एका व्याख्यानांत 'सीसम ॲण्ड लिलीज' यांत 'महान ग्रंथ म्हणजे मानसिक शक्तीचें खाद्य' म्हणून वर्णन केलें, व मिल्टननें तर मोठ्या ग्रंथाचें "the precious life blood of an author prolonged and kept on purpose for a life beyond life" असें वर्णन केलें. वरील वचनांचा विचार करून सर जॉन ल्यबाक ह्यांनीं 'आपल्या प्लेझर्स ऑफ लाईफ' ह्या ग्रंथांत 'धी हंड्रेड बेस्ट बुक्स'- शंभर सर्वेत्तम पुस्तकें- म्हणून एक मालिका प्रसिद्ध केली. व ते ग्रंथ प्रत्येक कुटुंबानें आपल्या खाजगी ग्रंथ संग्रहांत ठेवावे अशी शिफारस केली. लबॉकच्या सल्ल्याप्रमाणें 'रटलेज् ॲण्ड को' ह्या कंपनीनें आपलीं 'शंभर पुस्तकांची मालिका प्रसिद्ध केली, व त्यानंतर त्वरित 'जॉर्ज बेल ॲण्ड कंपनी' ह्यांनीं आपली मालिका, 'कॅसल आणि कंपनी' नें आपली नॅशनल लायब्ररी 'मॅकमिलन'ची एलिमेंटरी क्लासिक्स, ऑक्सफर्ड प्रेसची वर्ल्ड क्लासिक्स सेरीज' अशा तऱ्हेच्या मालिका प्रसिद्ध होवूं लागल्या. त्यांतल्या त्यांत अलिकडील Penguin or Pelican सीरीजमध्यें उत्कृष्ट ग्रंथांचा समावेश झालेला आहे त्यांतील कांहीं मालिका कौटुंबिक पुस्तकालयासाठीं नियोजिल्या होत्या, कांहीं शाळा वगैरे संस्थांच्या उपयोगार्थ होत्या.

अलिबागसारख्या ठिकाणीं कौटुंबिक पुस्तकालयें 'फॅमिली लायब्ररीज' थोड्याच असणार. येथील सार्वजनिक पुस्तकालय हेंच येथील प्रत्यक स्त्री-पुरुषाचें कौटुंबिक पुस्तकालय आहे; ह्या दृष्टीनें वरील वर्णिलेल्या मालिकांतील पुस्तकें येथील पुस्तकालयांत प्रामुख्यानें असणें हें अवश्य आहे. युरोपमध्यें मोठमोठया ग्रंथसंग्रहालयांत

एल्झीर क्लासिक्स, डेल्फियन क्लासिक्स, ॲन्थोस क्लासिक्स वगैरे दुर्मिळ झालेल्या व सोळाव्या ते अठराव्या शतकांत छापलेल्या पुस्तकांचा संग्रह असतो. असल्या संग्रहाकडे आपल्यासारख्या लहान पुस्तकालयाचा कटाक्ष असतां कामा नये. तरी पण मराठी ग्रंथांची, समृद्धी असावी तशी नाहीं व पुस्तकांची किंमतही भारी नसतें. तेव्हां मराठी नाट्य, कादंबऱ्या, काव्य वगैरे विषयांसंबंधी जीं जीं पुस्तकें मिळवतां येतील त्यांच्या जुन्या आवृत्या, तशाच नवीन [ कारण विलायतेस विद्यमान ग्रंथकारांच्या मूळ आवृत्तीच्या प्रती शेंकडों रुपयाला एक अशा विकल्या जातात ] ह्या सर्वांचा संग्रह जितका करितां येईल तितका करावा, अशी मी शिफारस करितों. अर्थात हस्तलिखितांचा संग्रह करणें ही गोष्ट आपल्या चिमुकल्या ग्रंथ संग्रहाच्या ध्येयांत येत नाहीं, तरी होतां होईल तों संग्राह्य पुस्तकांचा सांठा ठेवणें हें स्वस्त किंमतीच्या पुस्तकांची खरेदी करण्यापेक्षां अधिक मोलाचें ठरेल आपल्या मराठी, गुजराथी, कानडी वाङ्मयांतील कांहीं ग्रंथ अगदींच किरकोळ आकाराचे, कांहींतरी अगदीं चोपडींवजा असे दिसतात. त्यांना नीट पुठ्ठा देवून रीबायंडींग करणें ही गोष्टही आपल्या कर्तव्य क्षेत्रांत येते.

माझ्या अल्प समजुतीप्रमाणें मला आजच्या विषयासंबंधानें ज्या दोन गोष्टी सांगावयच्या होत्या, त्या सांगितल्या. त्यांत कांहीं दोष असल्यास आपण क्षमा करावी. माझ्या सारख्याला अध्यक्षपद देणें, हा आपलाच मोठा दोष आहे, तरी पण येथें येण्यानें मला फार आनंद झाला व ह्या पुस्तकालयाला अशी सुंदर इमारत लाभली आहे. हें पाहून तर तो आनंद द्विगुणीत झाला. ह्या पुस्तकालयाची उत्तरोत्तर भरभराट होईल, अशी मला खात्री आहे. व ग्रंथांचा अधिक विस्तार झाला, तरी इमारतीचा विस्तार वाढविण्याला जागेचा आवकाश आहे, ही तर अधिक आनंदाची गोष्ट आहे. मी आपले आभार आधींच मानावयास पाहिजे होते. निदान आतां तरी मानितों व आपली रजा घेतों



# ग्रंथालय-संघ व त्यांचे कार्य

श्री. र. श. पारखी, ग्रंथपाल, फर्ग्यूसन कॉलेज ग्रंथालय, पुणें.

[सार्वजनिक वाचनालय अलिबाग, रौप्य महोत्सव, ता. ५।६ आक्टोबर १९४६ प्रसंगीं कुलाबा जिल्हा वाचनालय संघ स्थापनेच्या वेळचें (६।१०।४६) अध्यक्षीय भाषण]

प्रिय ग्रंथालय-प्रेमी बंधु भगिनींनो,

आज आपण जिल्हा ग्रंथालय चळवळीवर चर्चा करण्याकरितां येथें जमलो आहोत. ह्या सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याचा मला आज आपण जो मान देत आहात, ह्या बद्दल मी आपणा सर्वांचे मन:पूर्वक आभार मानतो. महाराष्ट्रांत जिल्हा वाचनालय-संघ स्थापन करण्याची कल्पना ही प्रथमच प्रसृत करण्याचा मान आपल्या कुलाबा जिल्ह्यास मिळत आहे. अजूनपर्यंत जिल्हा वाचनालय संघ सबंध मुंबई प्रांतांत कोठेंही स्थापन झालेला नाहीं ही एक आपणांस मोठी अभिमानाची गोष्ट आहे. आपल्या वाचनालयांची संघटना करण्याकरतां व आपल्या प्रांतांत ग्रंथालयाच प्रसार करण्याकरता असे संघ स्थापन करणें सध्यां अगदीं अवश्यक व अगत्याचे आहे. असे संघ आपल्या प्रांतांतील ग्रंथालय चळवळीचे आधारस्तंभ होत.

या संघापासून आपली जीं उद्दीष्टें सफल होणार आहेत तीं अशी :—

(१) प्रत्येक नागरिकाला त्याच्या गरजेप्रमाणें त्याला हवी असलेली पुस्तकें सुलभतेनें मिळतील अशी योजना करणें.

(२) ज्यांना वाचनाची गोडी लागली नसेल अशांना ती लागावी म्हणून व्यवस्था करणें

(३) वाचकांची संख्या जशी वाढत जाईल, त्याप्रमाणें विविध प्रकारच्या प्रकाशनांची व्यवस्था करणें व त्यांचा पुरस्कार करणें.

(४) सरकार, स्थानिक स्वराज्य संस्था, व उदार धनीक नागरिक यांचेकडून शक्य तितकें द्रव्य मिळवून ग्रंथालयांच्या प्रसाराचें कार्य सुलभ करणें.

(५) अखिल जनतेच्या उपयुक्ततेकरतां गावोगावीं ग्रंथालयें व वाचनालयें उघडण्याचें सुसंघटीत प्रयत्न करून ग्रंथालयांचे एक भक्कम जाळें निर्माण करणें.

हे व अशा प्रकारचें ग्रंथालयांच्या चळवळीचें मुख्य हेतू असतात. जी ग्रंथालयें एकमेकापासून अलग राहतात अथवा जी कांहीं थोड्या निवडक वाचकांकरितांच चालविलीं जातात अथवा जी पुढील पिढीकरितां म्हणून ग्रंथसंग्रह जपून ठेवितात व सध्यांच्या पिढींतील वाचकांना खुलीं नसतात, अशी ग्रंथालयें कितीहि मोठीं व महत्वाचीं असलीं तरी त्यांचा अंतर्भाव ग्रंथालयांच्या चळवळींत होऊं शकत नाहीं. सध्या जशी ग्रंथालयें स्थापन होत आहेत तशी पूर्वीहि स्थापन होत होती. तरी सर्व देशांतील व राष्ट्रांतील ग्रंथालयांची चळवळ ही अगदी अलिकडीलच घटना आहे. तिचा उगम इंग्लंड व अमेरिका या देशांतून १ शतकापूर्वी झाला आणि युरोपांतील इतर देश व जपान या देशांत ३० वर्षांपूर्वी झाला व तिला आतां कोठें आपल्या हिंदुस्थानांत सुरवात होत आहे. या विधानाला फक्त बडोदें संस्थान अपवाद आहे.

देशांत जेव्हां निरक्षरांना साक्षर करण्याची व अशिक्षितांना सुशिक्षित करण्याची तीव्र अवश्यकता भासते व त्याबरोबरच प्रतिघडी जगांत ज्या उलाढाली चालू आहेत त्यांची सोप्या भाषेंत माहिती देणारी व अगदी अल्प किमतींत विकत मिळणारी पुस्तकें, नियतकालिकें व वर्तमानपत्रें सहज मिळूं शकतात, तेव्हांच ग्रंथालयांच्या चळवळीला योग्य संधी मिळतें. ती संधी आपल्या देशांत आतां निर्माण झालेली आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे.

अशा या सुसंधीच्या वेळीं सध्या चालू असलेलीं ग्रंथालयें लोकप्रिय कशी होतील याकडेच आपण विशेष लक्ष पुरविलें पाहिजें. ग्रंथालयांची लोकप्रियता त्यांतील ग्रंथांची उपयुक्तता ज्या प्रमाणें वाढलेली असेल त्या प्रमाणांत वाढू शकते, म्हणून पुस्तकांची उपयुक्तता वाढविण्याकरितांच ग्रंथालयांची योजना केलेली असतें ही मूलभूत कल्पना चालक व वाचक यांचे मनावर बिंबवण्याचें कार्य प्रथम बरेच जोमानें करावयास पाहिजे. पुस्तकांची उपयुक्तता वाढविणें म्हणजे त्यांच्या लेखकांनीं आपल्या जीविताचा अमूल्य काळ खर्चून त्यांत जें समाजउन्नती करितां उपयुक्त ज्ञान सांठविलेलें असतें तें योग्य वाचकांचे नजरेस सहज येईल अशी व्यवस्था करणें व तें त्या वाचकास भरपूर उपयोग करण्यास मिळेल अशी योजना करणें होय. या सर्वसाधारण विधानांत बऱ्याचशा गोष्टी अंतर्भूत आहेत. योग्य ग्रंथपालांची योजना, त्यांच्या सूचनेप्रमाणें जागेची, उपकरणांची व पुस्तकांची आणि अंतरव्यवस्थेची योजना व मांडणी आणि या सर्व गोष्टींना लागणाऱ्या खर्चाची योजना अशा विविध प्रश्नांचा बारकाईनें विचार करून योग्य साधनांनीं युक्त अशा ग्रंथालयें देशाच्या सर्व भागांतून जनतेच्या गरजेप्रमाणें स्थापन केलीं पाहिजेत.

सर्व प्रकारच्या मानव जातीच्या व्यवहारांत व व्यापारांत ग्रंथालयाचें स्थान फार उच्च आहे. कोणत्याही समाजाच्या सांस्कृतिक उन्नतीनें व शिस्तपालनाचें मोजमाप त्या समाजानें आपल्या ग्रंथालयांची व्यवस्था कशी ठेवलेली आहे यावर अवलंबून आहे. ज्या समाजानें ग्रंथालय संस्थेची आबाळ केली आहे, ज्यानें ज्ञानमंदिराला जनसमुहापासून दूर लोटलें आहे; ज्याला हे ज्ञानमंदीर पोसणें म्हणजे पैशाचा अपव्यय करणें असें वाटतें, त्या समाजास रानटी समाज असेंच म्हटलें पाहिजे. त्याला समाज ही संज्ञा सुद्धां शोभणार नाहीं.

पुस्तकांची उपयुक्तता वाढविण्याकरतां लहान मुलांच्या प्राथमिक शाळेपासूनच सुरवात झाली पाहिजे. मुलांना थोडें थोडें लिहितां वाचतां येऊं लागतांच, त्यांना स्वतःच्या आवडीचीं पुस्तकें उपलब्ध करून मनसोक्त वाचावयास मोकळीक दिली पाहिजे. त्यांना शिक्षकानें व ग्रंथपालानें सुरस व सचित्र पुस्तकांचे पुढें नेऊन त्यांतील उद्बोधक व मनोरंजक अशा गंमतीच्या गोष्टी सांगून त्या वाचावयास प्रवृत्त केलें पाहिजे. शिक्षणाचा हा टप्पा जितका उठावदारपणें पार पडेल, त्यावर मुलांच्या पुढील आयुष्यांतील वाचनाच्या गोडीची वाढ अवलंबून आहे. ज्याप्रमाणें सध्यां शिक्षणाच्या सुधारणेचा बारकाईनें विचार करण्यांत येत आहे; तसाच व त्याहून अधिक प्रमाणांत ग्रंथालयांचा प्रश्नही आपण हातांत घेतला पाहिजे. मुलांना शाळांतून स्वतंत्रपणें ग्रंथालयांचा म्हणजेच पर्यायानें संदर्भसाधनांचा व पुस्तकांचा उपयोग करून घेण्याची संवय सहज लागेल, अशी व्यवस्था सर्व शाळांतील ग्रंथालयातून व्हावयास हवी.

आमच्या ग्रंथालयांतील बहुतेक वाचकांना पुस्तकांच्या कपाटाजवळ जाऊन पुस्तकें निवडण्याचा कंटाळा असतो त्याचें कारण त्यांना तशी पुस्तकें निवडण्याची संवय नसते. तसेंच ग्रंथालयांतील ग्रंथ सूचींचा उपयोग करून घेणें सुद्धां कित्येक वाचकांना कंटाळवाणें वाटतें. वाचकांना स्वतंत्रपणें पुस्तकें निवडण्याची संवय लागावी म्हणून, प्रथमतः आमच्या ग्रंथालयांतील ग्रंथांची रचना सुलभ व सोईची करावयास पाहिजे, ग्रंथाच्या विषयाचे फलक कपाटावर लावले पाहिजेत; वाचकांना कपाटाजवळ जाण्यास मोकळीक दिली पाहिजे. ग्रंथांच्या सूची वाचकांना पहाण्यास सोप्या वाटतील, अशा तयार केल्या पाहिजेत. ग्रंथालयांतील वातावरण शांत व प्रसन्न ठेवले पाहिजे ग्रंथालयांच्या वेळा वाचकाच्या सोईप्रमाणें ठेवावयास पाहिजेत. ग्रंथालयांतील एकंदर व्यवस्था इतकी नमुनेदार असावयास पाहिजे कीं, सर्व प्रकारच्या वाचकांच्या गरजा सुलभतेनें भागवतां याव्यात व वाचकांना वरचेवर आपल्या नित्याच्या आयुष्यांतील नाना तऱ्हेच्या अडचणी व नाना तऱ्हेचे प्रश्न सोडविण्यांस ग्रंथालय हें एक मोठें साधन आहे, असें वाटलें पाहिजे.

निरनिराळ्या खेळांची माहिती पाहण्यास मुलें येतील; एखादा वकील कायद्याचे कूटप्रश्न सोडविण्यास येईल; एखादा संशोधक एखाद्या महत्वाच्या विषयाचें संशोधन करावयास येईल, कोणी रिकामा वेळ घालविण्यास चुरचुरीत व मनोरंजक पुस्तकांची मागणी करील,... अशा नाना तऱ्हेच्या वाचकांच्या मागण्या समाधानकारकपणें पुरविण्याचें कार्य आपल्या ग्रंथालयांना करतां आलें पाहिजे. तरच पुस्तकांची उपयुक्तता वाढूं शकेल.

मराठी ग्रंथालय संघानें सर्व ठिकाणच्या मराठी ग्रंथालयांची संघटना व संवर्धन करण्याचें कार्य हातीं घेतलें आहे. तें पार पाडण्यास जनतेने ह्या संघास सर्व प्रकारचें साहाय्य देऊन त्याच्या कार्यास प्रोत्साहन दिलें पाहिजे मुंबई सरकारनें प्रांतामध्यें ग्रंथालयांच्या सुधारणेंकरतां जी योजना तयार केली आहे, ती जितक्या वेगाने व जितक्या जोरानें सुरू केली जाईल, त्यावर मुंबई प्रांतातील ग्रंथालयांच्या सुधारणा बऱ्याचशा अवलंबून आहेत.

रावसाहेब रंगनाथन यांच्या अनुमानाप्रमाणें लोकसंख्येच्या मानानें सध्यां हिंदुस्थानात प्रत्येक मनुष्यागणिक एक शंभरांश पुस्तक सुद्धां उपलब्ध होईल किंवा नाहीं, याबद्दल शंका आहे त्याचप्रमाणें सध्यां अस्तित्त्वांत असलेल्या ग्रंथालयांतून प्रतिवर्षीं प्रत्येक मनुष्यागणिक निदान एक शंभरांश पुस्तक तरी वाचावयास दिले जातें किंवा नाहीं, याबद्दल सुद्धां खात्री देतां येणार नाही शंभर लोकांत एका व्यक्तीस सुद्धां उपयोगास येईल असें एखादें जवळपास ग्रंथालय अस्तित्वांत नाही. शिवाय हिंदुस्थान प्रतिवर्षीं प्रत्येक मनुष्यागणिक ग्रंथालयाप्रीत्यर्थ एक पैपेक्षां जास्त खर्च करीत नाहीं. इंग्लंड देश प्रत्येक मनुष्यागणिक १ रुपया खर्च करितो. व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें २ रुपये खर्च करतात.

लोकांमध्यें सध्यां ग्रंथालयांची वाढ व सुधारणा व्हावी, याबद्दल नुकती जाणीव होऊं लागली आहे; परंतु त्यांच्या चळवळीला सक्रीय पाठबळ देण्यास अजून सरकार, स्थानिक स्वराज्य संस्था व धनिक यांचें लक्ष नीटसें वेधलें गेलेलें नाहीं हा प्रश्न सध्यां आपल्या प्रांताचे लोकप्रिय पंत प्रधान व शिक्षणमंत्रि मान्यवर श्रीमान् बाळासाहेब खेर यांनीं हातांत घेतला असून, तो सोडविण्याचे त्यांचे प्रयत्न मोठ्या उत्सुकतेनें व बारकाईनें चालू आहेत ही आपणांस मोठी आनंदाची व अभिमानाची गोष्ट आहे.

अखिल भारतीय ग्रंथालय संघाची स्थापना झाल्याला आज १३ वर्षे पूर्ण झालीं आहेत. ह्या संघांत हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रमुख ग्रंथालयें सामील झालेलीं आहेत आतांपर्यंत ह्या संघाने एकंदर सात अखिल भारतीय ग्रंथालय संमेलनें हिंदुस्थानांतील प्रमुख शहरीं भरवून, देशाच्या निरनिराळ्या भागांतील व निरनिराळ्या प्रकारच्या ग्रंथालयांच्या ग्रंथपालांना एकत्र आणण्याचा व त्यांना एकमेकांच्या अनुभवाचा लाभ मिळवून देण्याचा सुयोग आणला आहे. संघानें आतांपर्यंत प्रसिद्ध केलेले अहवाल व गेलीं चार वर्षे इंग्रजींत चालविलेलें 'लायब्ररी बुलेटिन' नांवाचे नियतकालिक हीं ह्या देशांतील ग्रंथालय चळवळीला ज्या ग्रंथपालांनीं वाहून घेतलें आहे, त्यांच्या व ह्या चळवळीला आस्थापूर्वक सहाय्य करणाऱ्या व त्यांच्याविषयीं कळकळ बाळगणाऱ्या निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या महत्वपूर्ण निबंधांनीं व भाषणांनीं भरलेलीं असल्यामुळें आपणा सर्वांस ग्रंथालयांच्या प्रसाराचे कामीं मार्गदर्शक आहेत.

रावसाहेब रंगनाथन यांनी तर आपल्या देशावर अनर्घ्य असे बहुमोल उपकार करून ठेवले आहेत त्यांची (१) आतांपर्यंतच्या सर्व वर्गीकरण पद्धतींमध्यें उत्कृष्ट अशी ठरलेली 'द्विबिंदू वर्गीकरण पद्धति' (२) जगांतील ग्रंथालय चळवळ व ग्रंथालय व्यवसाय यांच्या इतिहासाचे मनोरंजक वर्णन करणारा त्यांचा "ग्रंथालयाचीं पांच तत्त्वें" या नांवाचा अद्वितीय ग्रंथ, (३) अर्वाचीन ग्रंथालयांच्या सूचींच्या आतांपर्यंत उपलब्ध असलेल्या नियम संग्रहांचा पूर्ण अभ्यास करून ज्या नियमांची सध्यां विशेष उणीव भासत होती, असे "वर्ग–सूची" चे नियम प्रथमच तयार करून भरपूर उदाहरणां-सहित प्रसिद्ध केलेला "वर्ग–सूचि–नियम" ग्रंथ, तसेंच (४) सर्व प्रकारच्या ग्रंथालयांचें नियंत्रण सुसूत्रपणें व अगदीं नियमबद्ध चालावें म्हणून तयार केलेला "ग्रंथालय कारभाराचा" विस्तृत ग्रंथ, (५) ग्रंथालयांतील संदर्भकार्य व सूचिकार्य यांना योग्य प्रकारें मार्गदर्शन करणारे दोन उत्कृष्ट ग्रंथ व (६) ग्रंथपालांना निरनिराळ्या रीतीनें उपयोगी पडणारे ६–७ ग्रंथ व ग्रंथालय व्यवसायावरील आतांपर्यंत प्रसिद्ध झालेले त्यांचे हजारों लेख, हें पाहिले म्हणजे आपणांस एवढा मोठा आंतरराष्ट्रीय मान्यता मिळविलेला व आपल्या देशांतील ग्रंथालय व्यवसायाला योग्य वळण लावणारा अद्वितीय ग्रंथपाल लाभल्याबद्दल आत्यंतिक आनंद व अभिमान वाटतो व अशा ग्रंथपालाच्या मार्गदर्शनाचा फायदा आपण पुरेपूर करून घेतला पाहिजे, असें कोणासही वाटल्यावाचून

आपल्या दशांत प्रांतीय ग्रंथालय संघ इ. स १९२० पासून हळूहळू स्थापन होत आहेत व सरकारचे व जनतेचे त्यांना चांगलेसे सहाय्य नसलें तरी त्यांनीं आपले कार्य अल्प प्रमाणांत कां होईना चालू ठेवले आहे.

भारतीय ग्रंथालय चळवळीचे उगमस्थान बडोदें संस्थान होय. तेथें इ. स १९०७ पासून राजाश्रयाखालीं मोफत ग्रंथालयांच्या स्थापनेला सुरवात झाली. त्या संस्थानाचे साहित्यप्रेमी व विद्याभिलाषी अधिपती कै. सयाजीराव महाराज यांनी त्या वर्षांपासून संस्थानात ग्रंथालयांचा प्रसार पाश्चिमात्य देशांतील ग्रंथालयांच्या धर्तीवर सुरू केला व आतांपर्यंत त्या संस्थानांतील ग्रंथालयांची वाढ व सुधारणा प्रशंसनीयपणें चाललेली आहे, हें सर्वश्रुतच आहे.

पंजाब प्रांतात ग्रंथालयाच्या चळवळीला इ स १९१५ मध्यें सुरवात झाली. त्याचें बरेचसे श्रेय पंजाब विश्वविद्यालयाचे त्या वेळचे अमेरिकन ग्रंथपाल श्री. डिकीन्सन् याना आहे. त्यांचे 'पंजाब लायब्ररी प्रायमर' हें पुस्तक फार उपयुक्त आहे.

इ. स. १९१९ मध्यें मद्रास येथें बडोद्याचे विद्वान व लोकप्रिय ग्रंथालयप्रमुख कै. रा. रा. कुडाळकर यांचे अध्यक्षतेखालीं अखिल भारतीय सार्वजनिक ग्रंथालय परिषद भरली होती. त्या वेळेपासून सार्वजनिक ग्रंथालय अखिल भारतीय व प्रांतीय परिषदा भरण्यास सुरवात झाली. इ. स. १९२१ मध्यें साहित्यसम्राट श्री. रा रा. तात्यासाहेब केळकर यांच्या मार्गदर्शनाखाली महाराष्ट्र ग्रंथालय संघाची स्थापना झाली व त्याच वर्षी नेकनामदार बाबासाहेब जयकर यांचे अध्यक्षतेखाली महाराष्ट्रातील ग्रंथालयें व वाचनालयें यांची परिषद पुणें येथें भरली. यानंतर दुसरी परिषद पुणें येथेच सन १९२६ मध्यें नामदार केशवराव, दक्षिण हैदराबाद यांचे अध्यक्षतेखाली भरली होती. ता. १५ नोव्हेम्बर १९३५ रोजी पुणें ग्रंथालय संघाची स्थापना करण्यात आली. व त्या संघातर्फे ता. २५ नोव्हेम्बर १९३५ रोजी ॲन्ड्यू कॉर्नेजी यांच्या शतसंवत्सरीक उत्सवानिमित्त पुण्यांतील ग्रंथालयांचें एक छोटेसे संम्मेलन भरविण्यांत आले होतें.

तेव्हांपासून इ. स १९४४ पर्यंत ह्या संघास फारसें कार्य करितां आलें नाही. इ. स. १९४४ चे डिसेंबर महिन्यांत रावसाहेब रंगनाथन् पुण्यास आले होते, व त्यानी ग्रंथालयांच्या महत्त्वाबिषयीं कांहीं सुश्राव्य व्याख्यानें दिली. त्या नंतर या संघाचे कार्य पुन्हां जोमानें सुरू करण्यांत आलें व आतां ह्या संघाच्या सभा वरचेवर होत असून, पुण्यांतील ग्रंथालयांचे संघटन करण्याचे कार्य हा संघ उत्तमप्रकारें करीत आहे.

मुंबई विश्वविद्यालयाचे विद्वान ग्रंथपाल डॉ. पु. म. जोशी यांनीं इ. स. १९३६ मध्यें त्या ग्रंथालयाची जबाबदारी हातीं घेतल्यापासून त्या ग्रंथालयाची बरीच सुधारणा घडवून आणली आहे. भारतीय ग्रंथालय संघाचे ते एक उपाध्यक्ष आहेत. हिंदुस्थानांतील व मुंबई इलाख्यांतील ग्रंथालयांच्या चळवळीला त्यांचें वारंवार चांगले प्रोत्साहक मार्गदर्शन मिळत आहे. मुंबई सरकारच्या मुंबई ग्रंथालय उत्कर्ष समितीच्या कामांत त्यांनीं बारकाईने लक्ष घातलें होतें. त्यांचे नियंत्रणाखालीं मुंबई विश्वविद्यालयामध्यें गेलीं चार वर्षे ग्रंथालय शिक्षणाचे वर्ग चालविले आहेत ग्रंथालय शास्त्रावर महाराष्ट्रांत लहान-मोठीं बरींच पुस्तकें प्रसिद्ध व्हावीत म्हणून त्यांनीं कै. खुश्रु तारापुरवाला नांवाचा फंड जमा केला आहे व त्या फंडांतून होतकरू ग्रंथकाराना मदत करण्याची योजना केलेली आहे या योजनेतर्फे नुकतीच चार पुस्तकें प्रसिद्ध झालेली आहेत. त्यांच्या मार्गदर्शनाचा उपयोग आपणा सर्वांस विशेष होणार आहे

इ. स १९१९ पासून इ. स. १९३३ पर्यंत हिंदुस्थानांत अखिल भारतीय स्वरूपाची तीन संमेलनें भरलीं होतीं. त्यापैकीं एक १९२३ सालीं बेझवाडा (आंध्रप्रांत) येथें भरले होते दुसरें १९२७ च्या डिसेंबरमध्यें मुंबई येथें भरलें होतें. त्यानंतर इ. स. १९२८ मध्यें नाशीपूरचे राजेसाहेब यांचे अध्यक्षतेखालीं भरलें होतें; व इ. स १९३० च्या डिसेंबरमध्यें बडोद्याचे त्या वेळचे उत्साही व लोकप्रिय ग्रंथालय प्रमुख श्री न्यूटन मोहनदत्त यांचे अध्यक्षतेखालीं, अखिल आशिया शिक्षण परिषदेची ग्रंथालय शाखा परिषद् म्हणून काशी येथें भरली होती त्यावेळीं त्या परिषदेचे चिटणीस रावसाहेब रंगनाथन् होते व त्यांनीं त्या परिषदेंत वाचण्याकरितां जे निबंध आले होते ते सर्व एका स्वतंत्र पुस्तकांत छापून परिषदेतर्फे संपादन करून प्रसिद्ध केले आहेत.

इ. स. १९४२ मध्यें मुंबईस जेव्हां अखिल भारतीय ग्रंथालय परिषद भरली होती त्यावेळीं डॉ. जोशी याच्या प्रोत्साहनानें एक मुंबई ग्रंथालय संघ स्थापन झाला आहे त्याच्या कार्याला योग्य चालना देण्याचे कार्य आपण सर्वांनीं हातीं घेतलें पाहिजे.

रावसाहेब रंगनाथन यांचे प्रोत्साहनानें इ. स. १९२८ मध्यें मद्रास ग्रंथालय संघाची स्थापना झाल्यापासून त्या संघाचें ग्रंथालयांच्या संघटनेचे व प्रसाराचें कार्य अखंडपणें चालू आहे व सध्या मद्रास इलाख्यांत ग्रंथालयांच्या चळवळीचे कार्य या संस्थेच्या नेतृत्वाखालीं उत्तम प्रकारें चालू आहे.

इ. स. १९४२ मध्यें कोचीन व त्रावणकोर या दोन संस्थानांत ग्रंथालयांचा प्रसार संघटीत रीतीनें व्हावा म्हणून केरळ ग्रंथालय संघाची स्थापना झाली. बिहार, दिल्ली, मध्य हिंदुस्थान व मध्यप्रांत येथेंही अलीकडे ग्रंथालय संघाची स्थापना झाली आहे. ह्या सर्व घडामोडीमुळें आतां ग्रंथालयांच्या चळवळीला आपल्या देशांत एक नवचैतन्य निर्माण झाल्यासारखे आहे व म्हणून आतां आपण लवकरच ग्रंथालयांचा कायदा प्रांताप्रांतातून जारी करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

ग्रंथालयांच्या कायद्याचा मसुदा रावसाहेब रंगनाथन् यांनीं इ स. १९३० मध्येंच तयार करून ठेवला आहे. इ. स. १९३१ मध्यें बंगाल ग्रंथालय समितीच्या अध्यक्षानी श्री. रंगनाथन् यांनी तयार केलेला सार्वजनिक ग्रंथालयांच्या कायद्याचा मसुदा बंगालच्या वरिष्ठ विधीमंडळांत मांडण्याचा प्रयत्न केला होता परंतु त्यांतील कलमे सरकारास बंधनकारक अशी वाटल्यामुळे तो मांडण्यास त्यांना परवानगी मिळाली नाही.

नंतर हा मसुदा मद्रास प्रांतास लागू केला जावा, म्हणून मद्रास ग्रंथालय समितीनें इ. स. १९३३ मध्यें शंभर स्थानिक संस्थांच्या सम्मतिनें वरिष्ठ विधिमंडळांत तो मांडला व त्या करितां निवडलेल्या समितीच्या टप्प्यांतून तो मान्यतेकरितां विधिमंडळापुढेंही आला होता; परंतु १९३५ च्या हिंदुस्थान सरकारच्या राज्यव्यवस्थेच्या नवीन कायद्याअन्वयें जुनें विधिमंडळ विसर्जन पावून, नवीन विधिमंडळ निर्माण झाल्यामुळें तो मसुदा तसाच स्थागित राहिला. इ. स. १९३६ मध्यें रावबहादुर बोले यांनी मुंबई इलाखा वाचनालय कायद्याचा मसुदा वरिष्ठ विधिमंडळांत मांडण्यास परवानगी मागितली होती; परंतु त्याचा पुढे कांहींच विचार करण्यांत आला नाहीं हे असें जे नानातऱ्हेचे अडथळे आपल्या ग्रंथालय चळवळीमध्यें येत आले आहेत, त्यामुळें आपण ग्रंथालयांच्या सुधारणांबाबत बाह्य जगाच्या मागें अदमासें एक शतक आहोंत, ही आपणांस फार कमीपणा आणणारी गोष्ट आहे.

शिक्षणाला वाचनाची जोड पाहिजे; इतकेंच नव्हेतर वर्गांतील शिक्षण हें नुसतें मार्ग-दर्शन-पर असतें व पुढील बरेचसे ज्ञान संपादन वाचनालयांत करावयाचें असतें, याबद्दल विचार आपल्या शिक्षण संस्थांतून क्वचितच केला जातो. ग्रंथालयाचें काम करण्यास स्वतंत्र व लायक ग्रंथपाल आपल्या बहुतेक शाळांतून नसतो. ग्रंथालयाच्या कामाची नीटशी माहिती नसेल, अशा एखाद्या शिक्षकाला अगर

कारकुनाला रोज दोन तीन तास कसेंबसें ग्रंथालयाचें काम करण्यास सांगितले जातें. त्यामुळें तेथील काम जसे व्यवस्थितपणें व उठावदारपणें व्हावयास हवें तसें तें होत नाही. सार्वजनिक ग्रंथालयांतूनसुद्धां आतांपर्यंत या प्रश्नाकडे बरेचसें दुर्लक्ष केलें गेलें आहे.

आपलीं ग्रंथालयें व वाचनालयें लोकांच्या टीकेस पात्र होण्याचीं बरीचशीं कारणें आपल्या सर्वांस विदीतच आहेत. आजवर आपण ग्रंथालयाचे चांगले नियंत्रण म्हणजे काय व तें कसे गेले जाईल यांचा विचारच केलेला नाही. ग्रंथालयांतील पुस्तकें बहुसंख्येनें वारंवार हरवणें, ग्रंथालयातील कित्येक पुस्तकांची नोंद मुळीं केलेलीच नसणे; त्यांच्या याद्या कित्येक ग्रंथालयात केलेल्या नसणें, कित्येकांत त्या केलेल्या असल्या तरी सर्वमान्य पद्धतीने न केलेल्या व त्यामुळें संदर्भास निरुपयोगी अशा असणें; घरी वाचावयास दिलेल्या पुस्तकाची नोंद संदर्भाच्या दृष्टीनें सोयीची अशी केलेली नसणें ......अशा अनेक प्रकारच्या अव्यवस्थीत कामामुळें आपल्या ग्रंथालयांतील ग्रंथसंग्रहांची वाढ नीट होत नाहीं व आहेत त्या पुस्तकांची उपयुक्तता वाढविण्यास योग्य असे उपाय योजले जात नाहीत.

यापुढें आपणांस पुस्तकांची उपयुक्तता वाढविण्याचे दृष्टीनें अनेक उपाय योजले पाहिजेत. वाचनालयांतील कपाटाची दारें व कुलपें काढून टाकून त्यातील पुस्तकें स्वतंत्रपणें शोधण्यास वाचकांना मोकळीक दिली पाहीजे. इतकेच नव्हे तर कांहीं वाचक तसा संकोच करीत असतील अथवा अशा सवलतीची उपयुक्तता कित्येकांना पटली नसेल तर त्यांचा संकोच नाहींसा करून त्यांना प्रत्यक्ष कपाटांतून पुस्तकें निवडल्यामुळे किती तरी फायदे होतात हें समजावून सांगितले पाहिजे. वाचकांना अशी सवलत दिली तर ग्रंथालयांतील पुस्तकें नाहीशी होण्याचे प्रमाण बरेच वाढेल अशी भीती कित्येकास वाटतें; परतु इंग्लंड, अमेरिका, सोव्हिएट रशिया वगैरे प्रमुख देशांतील ग्रंथालयांचा अनुभव अगदीं उलट आहे. त्यांचा अनुभव असा आहे कीं, आपण वाचकांना जितक्या ज्यास्त सवलती देतो व त्यांचेकरितां ग्रंथालयांतून जितक्या ज्यास्त सोयी वाढवितो तितकें ग्रंथालयांतील पुस्तकें नाहिसें होण्याचे प्रमाण हळूहळू कमी होत जाते तेथें वाचकांना कपाटांतून पुस्तकें पाहण्यास मोकळीक देतात, व त्याचबरोबर त्यांना पुस्तकें निवडण्यास व संदर्भ पाहण्यास मदत करण्याकरितां तेथें फिरते संदर्भ मदतनीस (Reference assistant) अथवा संदर्भ मार्गदर्शक (Reference adviser) असतात. त्याच्या विषयीं वाचकांना विशेष आदर वाटतो व त्यांची संग्रहालयांत सारखी हालचाल चालू

असतें. त्यामुळें त्यांच्या ग्रंथालयांतील ग्रंथ नाहिसे होण्यास वावच मिळत नाहीं. शिवाय मुख्य दरवाजातून आंत येताना कोणाही वाचकास एखाद्या वहीशिवाय कोणतेही सामान आंत नेऊं दिले जात नाहीं; व घरीं वाचावयास द्यावयाची पुस्तकें वाचक ग्रंथालयांतून बाहेर जावयास निघतात त्याच वेळीं दिली जातात. पुस्तकें नियमित परत येतील याबद्दल विशेष काळजी घेतली जाते. तेथील ग्रंथालयांतून कोणीही वाचक प्रमाणाबाहेर व बेमुदत अशी पुस्तके नेऊच शकत नाही. आमच्या ग्रंथालयांतून याबाततीत फारच गोंधळ चाललेला असतो. कित्येक वाचक आपणास वाटेल तितकीं पुस्तकें घरीं नेण्याची मुभा असल्यामुळें वेळोवेळी प्रमाणाबाहेर पुस्तकें नेतात; त्यांतील बरीचशीं पुस्तकें त्यांचे जवळून त्यांची स्नेही मंडळी घेऊन जातात व या नेलेल्या पुस्तकांची नोंद केलेली नसल्यामुळे नाना तऱ्हेचे अनर्थ उद्‌भवतात. या वरून आपण इतकेंच लक्षांत ठेवायचें की ग्रंथालयांतील व्यवस्था चोख असेल तर पुस्तकें हरवण्याची शक्यताही त्या प्रमाणांत कमी असूं शकेल.

वाचकांस कपाटांतून पुस्तकें निवडण्यास मोकळीक दिली तर साहजीकपणेंच कपाटांतील पुस्तकांची रचना वाचकाना सोयीची वाटेल अशीच ठेवली पाहिजे. तीं योग्य होण्यास पुस्तकांचे वर्गीकरण सर्वमान्य अशा वर्गीकरण पद्धतीप्रमाणें करणें सोयीचें आहे. या नंतर वाचकांना ग्रंथालयांत असलेलीं, परंतु तेथून बाहेर वाचावयास गेलेली पुस्तकें असतात त्यांची माहिती सुलभतेनें मिळावी व तसेंच ते ज्या विषयांची पुस्तकें पहात असतील त्या विषयांवर इतर विषयांतील पुस्तकांतून कांहीं महत्त्वाचे संदर्भ आलेले असले तर ते दाखविण्यास ( १ ) वर्ग-सूची, ( २ ) ग्रंथकारनाम सूची, ( ३ ) ग्रंथनाम सूची, ( ४ ) विषयनाम सूची, व ( ५ ) आणखी निरनिराळ्या संदर्भ सुलभता वाढविण्यास लागणाऱ्या स्वतंत्र संदर्भ सूची...... अशा सर्व प्रकारच्या सूची शास्त्रीय पद्धतीनें लायक अशाच ग्रंथपालाकडून करून घेतल्या पाहिजेत. वाचक ग्रंथालयांत येतांच त्यांचे स्वागत करण्यास व ग्रंथालयांतील त्यांचेकरितां केलेल्या सोयी व व्यवस्था त्यांना समजावून सांगण्याकरितां एक लोकप्रियतेस पात्र होण्यास समर्थ असा संदर्भशोध-निपूण मदतनीस अथवा मार्गदर्शक असला पाहिजे. ग्रंथालयांतील नियत-कालिकांतील वेळोवेळीं निरनिराळ्या विषयांवर येणाऱ्या लेखांची सूची सुद्धा तयार ठेवणें अगत्याचे आहे अशा नानाप्रकारच्या सोयी वाचकांकरितांच आपल्या ग्रंथालयांतून ठेवल्या तर पुढील दहा वर्षांत आपलीं ग्रंथालयें कोणत्याही पुढारलेल्या राष्ट्राच्या बरोबरीस येण्यास

कठीण जाणार नाहीं; व आपल्या ग्रंथालयांतील बहुतेक पुस्तकांच्या वाचनाची व ग्रंथालयांत आपला बराच काळ घालविण्याची संवय अधिक अधिक लागूं शकेल. हें सध्यां आपणास स्वप्नवत भासतें आहे; परंतु सध्यां आपल्या प्रांताच्या लोकप्रिय व प्रातिनिधीक सरकारनें ग्रंथालयांचा प्रसार करण्याकरिता मुंबईस केंद्रीय ग्रंथालय व पुण्यास महाराष्ट्राचें प्रांतीय ग्रंथालय, धारवाडास कर्नाटकचें प्रांतीय ग्रंथालय, अहमदाबादेस गुजराथचे अशी स्थापण्याचा उपक्रम सुरू केल्यामुळें आपणास आतां आपल्या प्रांतांत ग्रंथालयांची वाढ व सुधारणा होण्याची विशेष आशा वाटत असणें अगदीं स्वाभाविक आहे. सरकारचा हा स्तुत्य प्रयत्न यशस्वी होण्यास जनतेंतील ग्रंथालयप्रेमी लोक पुढें आले पाहिजेत व त्यांनीं जिल्ह्यांतून ग्रंथालय-संघ स्थापून जिल्ह्यांच्या मुख्य शहरांतील व तालुक्यांच्या मुख्य गांवांतील ग्रंथालयें व वाचनालयेंही सुसंघटीत व सुनियंत्रित करण्याचा प्रयत्न केला पाहिजे ही ग्रंथालयांची साखळी आपणास खेडेगांवांपर्यंत पोंचवावयाची आहे. व आपले मुख्य कर्तव्य आपल्या खेडेगांवातील बांधवांना वाचनाची गोडी लावून त्यांना बाह्य जगाच्या उलाढाली सहज समजाव्यात व त्यांची दृष्टी व्यापक व्हावी म्हणून निरनिराळीं पुस्तकें व वर्तमानपत्रे वाचण्याची संवय लावली पाहिजे हें होय. आज आपले सरकार खेडेगांवांतून वाचनालयें उघडण्यास अगदीं उत्सुक आहे. अगदीं लहान लहान खेडीं असतील तेथील नागरिकांनीं जर प्रतिवर्षी रु २५ जमा केलें तर सरकार तितकीच रक्कम मदत म्हणून त्यांना प्रतिवर्षी देण्यास तयार आहे. एक हजारावर वस्ती असलेल्या खेड्याला रु. १००, २००० ते ५००० पर्यंत वस्तीच्या गांवाला रु. १५०, ५००० पेक्षां जास्त वस्तीच्या गावांला रु. ५००, तालुक्याच्या मुख्य गांवाला सुरवातीला ५०० रु. व पुढें ज्यास्तींत ज्यास्त रु. १०००, जिल्ह्याच्या शहराला सुरवातीला रु. ३००० व पुढें ज्यास्तींत रु. ६००० याप्रमाणें निरनिराळ्या ग्रंथालयांना मदत देण्याचें सरकारनें ठरविलें आहे. सरकारनें ही जी योजना आखली आहे त्यांत पुढें कारणपरत्वें फरक करावा लागेल याची सरकारला पूर्ण जाणीव आहे आपण फक्त सध्यां सरकारचें लक्ष ह्या महत्त्वाच्या कार्याकडे केंद्रित झालेलें आहे हें पाहून लागोपाठ ग्रंथालयें व वाचनालयें उघडण्याकरितां जिल्हानिहाय व तालुकानिहाय ग्रंथालय संघ स्थापन करून आपल्या बांधवामध्यें या कार्याचें महत्त्व पटवून त्यांना गांवोगांवी वाचनालयें उघडण्यास प्रोत्साहन दिलें पाहिजे. तसेंच नगर पालिका व लोकल बोर्डे ह्या स्थानिक स्वराज्य संस्थाकडून सरकारप्रमाणेंच मदत मिळविण्याची खटपट विशेष जोमानें करावयास पाहिजे. हें कार्य जसें प्रांतीय सरकारचें आहे तसेंच तें स्थानिक स्वराज्य संस्थांचेंही आहे.

स्थानिक स्वराज्य संस्था, प्रांतीय सरकार व जनता यांची ग्रंथालयांच्या प्रचाराच्याबाबतींत एकी जितकी त्वरीत घडून येईल तितकी आपल्या प्रांतांत ग्रंथालयाच्या प्रचाराला चांगली मदत होईल व लवकरच आपणांस ग्रंथालयांचा कायदा देखील आपल्या प्रांतांत, जारी करून घेतां येईल. या कायद्यान्वयें स्थानिक स्वराज्य संस्थांना प्रजेच्या उत्पन्नावर ठराविक प्रमाणांत ग्रंथालय कर अथवा पट्टी बसविण्याचा अधिकार देवून त्यांच्या अधिकाराच्या कक्षेत येणाऱ्या प्रांतांतील निरनिराळ्या गावीं ग्रंथालयें उघडून त्यांचा उपयोग जनतेला बिनामुल्य करून देण्याची जबाबदारी येतें. या कायद्यामुळे, आपले अनेक तऱ्हेचे फायदे होणार आहेत ग्रंथालयांचा व त्यांतील साहित्याचा उपयोग योग्य रितीनें केला जावा म्हणून या कायद्यांत कांहीं नियम केले जातात व त्या अन्वयें वागण्याचे बंधन वाचकांवर घातलेलें असते त्याचे उल्लंघन करणारास ग्रंथालयांत येण्याची मनाई करण्याचा व इतर कायदेशीर इलाज करण्याचा अधिकार स्थानिक अधिकारी मंडळाला असतो.

मध्यवर्ती-ग्रंथालय-अधिकारी-मंडळ निरनिराळ्या ग्रंथालयांमध्यें समानता व सहकार्य घडवून आणण्याकरितां एक माहिती खातें ( Information Burean ) नेमते. हें खातें सर्व ग्रंथालयांतील ग्रंथ-संग्रहाची एक संकलित सूची संदर्भाकरितां ठेवतें; व निरनिराळ्या ग्रंथालयांतून गांवोगांवीं ग्रंथांच्या देवघेवी करते. गरजूंना अवश्यक वाङ्मयीन माहिती पुरविते. ग्रंथालयांची प्रसिद्धी वाढविते, निरनिराळ्या विषयांवर सूची तयार करते; ग्रंथालयांच्या कामांत सुधारणा घडवून आणते. ग्रंथपालांना ग्रंथालय शास्त्राचें शिक्षण देण्याची व्यवस्था करते व ग्रंथालयांच्या पुरस्कारार्थ करावी लागणारी सर्व कामें करते. या कायद्यामुळें प्रत्येक नागरिकाला पाहिजे असलेले पुस्तक व इतर साहित्य घरपोंच मिळण्याची व्यवस्था करितां येते, व अगदीं अल्पखर्चांत बहुसंख्य जनतेला आवडीचें निवडक वाङ्मय पुरविण्याचे व समाजाची ज्ञानलालसा वाढविण्याचे व ती भागविण्याचे उज्वल कार्य उत्तम प्रकारें सिद्धीस नेता येते. हें कार्य एकेकट्या ग्रंथालयांना स्वतंत्रपणें समाधानकारक रितीनें करितां येणें शक्य नाहीं.

रावसाहेब रंगनाथन यांनीं नुकतीच एक अखिल भारताकरितां "राष्ट्रीय ग्रंथालय योजना" तयार केली आहे त्या योजनेप्रमाणें आणखी तीस वर्षांनीं म्हणजे इ. स. १९७६ मध्यें हिंदुस्थानांतील ग्रंथालयांची एक भक्कम साखळी तयार होणार आहे त्यासाखळी प्रमाणें (१) दिल्ली येथें एक विशाल व व्यापक स्वरुपाचें राष्ट्रीय केंद्र ग्रंथालय ( National Central Library ) (२) २७ प्रांतीय केंद्र ग्रंथालये

(Provincial Central Libraries) (३) १०० प्रांतीय शाखा ग्रंथालयें व त्यांच्या ५००० शाखा (४) ५०० जिल्हा केंद्र ग्रंथालयें व त्यांच्या ५००० शाखा. शिवाय नानाविध शिक्षण संस्थांची, संशोधन संस्थांची, निरनिराळ्या व्यवसायांची, सरकारी निरनिराळ्या खात्यांची, अशी अनेक ग्रंथालयें असतील.

या ग्रंथालयांवर वार्षिक खर्च २४ कोटी रुपये होईल, पैकीं (१) एक कोट राष्ट्रीय केंद्र ग्रंथालयांवर (२) २० कोटी सर्व प्रांतांतील सार्वजनिक ग्रंथालयांवर (३) १ कोट भिन्न व्यवसायांची व सरकारी खात्यांची ग्रंथालयें यांचेवर (४) २ कोटी शिक्षण संस्थांच्या ग्रंथालयांना द्याव्या लागणाऱ्या मदतीकरितां, हें रावसाहेब रंगनाथन यांचे स्वप्न खरें करण्याचा निश्चय आपण सर्वांनीं आतांच केला पाहिजे. आपल्या देशांत जेथें जेथें लक्षाधीश व कोट्याधीश उदार धनिक असतील ते ग्रंथालयांच्या प्रसाराकरितां सढळ हातानें मदत करण्यास पुढें येतील तर आपल्या देशाच्या उर्जितावस्थेचा काळ खरोखरच समीप आला आहे असें म्हणावे लागेल. आमच्या लक्ष्मीपतींनी या बाबतींत जग प्रसिद्ध अब्जाधीश [Andru Karneji] ॲन्ड्र्यू कार्नेजी यांचें आदर्श उदाहरण डोळ्यापुढें ठेविल्यास कितीतरी पटीनें व अगदीं अविलंबितपणें आपल्या ग्रंथालयांच्या प्रचाराचा प्रश्न सहज रितीनें सुटेल ! इंग्लंड व अमेरिका येथील ग्रंथालयांच्या प्रसाराकरितां कार्नेजीनें एकंदर १०० कोटी रुपयांच्या देणग्या दिल्या आहेत.

बंधू भगिनींनो आपण माझें भाषण शांतपणें ऐकलेंत याबद्दल मी आपलें मनःपूर्वक आभार मानतो व आपल्या आवडत्या सार्वजनिक वाचनालयाची उत्तरोत्तर चांगली भरभराट होवो, अशी सदिच्छा व्यक्त करून मी आपले भाषण संपवितो.

# जिल्हा रायगड

श्री. अ. का. प्रियोळकर, B. A.

[ ता. १ जानेवारी १९४८ रोजीं, गोरेगांव, जि. कुलाबा येथें भरलेल्या १ ल्या कुलाबा जिल्हा वाचनालय परिषदेच्या वेळचें अध्यक्षीय भाषण ]

आपल्या जिल्ह्याच्या या पहिल्या ग्रंथालय–परिषदेच्या अध्यक्षस्थानीं माझी योजना करून आपण जो माझा सन्मान केलात त्याबद्दल आपले आभार मानणें मीं माझे कर्तव्य समजतों. आपल्या जिल्ह्यात मी हा पहिल्यानेंच पाऊल ठेवीत आहे. आपल्या जिल्ह्यासंबंधीं मला जे काय थोडें ज्ञान असेल तें केवळ पुस्तकें किंवा नकाशे अशा द्वारानें झालेले प्रत्यक्ष असा परिचय मुळींच नाहीं येथील स्थानिक परिस्थिति, लोकांमधील साक्षरता व आर्थिक व बौद्धिक तयारी वगैरे गोष्टींची जर मला विशेष माहिती असती तर कदाचित् मी आपणास आत्मविश्वासपूर्वक मार्गदर्शन करूं शकलों असतों. आपल्या कुलाबा जिल्ह्यांतच जन्म घेऊन बाहेर प्रतिष्ठेला पोंचलेल्या एकाद्या विद्वानाची जर माझ्या जागीं आपण निवड केली असती तर त्याचा आपणांस जास्त उपयोग झाला असता अशा सुपुत्रांची आपल्या कुलाबा जिल्ह्याला वाण नाहीं आपल्या जिल्ह्यानेंच काय, पण महाराष्ट्रानें किंबहुना साऱ्या हिंदुस्थानने ज्यांच्या संबंधी अभिमान बाळगावा, असे बुद्धिमान व प्रेमळ गृहस्थ सर चिंतामण देशमुख हे आपल्या कुलाबा जिल्ह्यांतील तळें गांवांतील आहेत. रिझर्व बॅंकेचे ते गव्हर्नर आहेत एवढ्या स्थानमहात्म्यावरून त्यांची मी योग्यता ठरवीत नाहीं. परंतु त्यांचा व माझा जो अल्प-स्वल्प परिचय आहे त्यावरून त्यांची ग्रंथांसंबंधी आवड व लोकहिताविषयीं निस्सीम तळमळ मीं जाणूं शकतों त्यांच्यामध्यें आहे त्यापेक्षां जर कमी विनय किंवा भीडस्तपणा असता तर त्यांचा समाजाला व सार्वजनिक कार्याला फायदा झाला असता. माणूस केवढ्याही मोठ्या योग्यतेला चढला तरी तो जननी व जन्मभूमी यांच्या सेवेला नेहमीच तयार असणार. सर चिंतामणानंतर मला नांव आठवले ते महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदारांचे दत्तोपंत हे मूळ आपल्या महाड तालुक्यांतील बिरवाडी गांवचें आहेत हें आपल्यापैकीं पुष्कळांना ठाऊक असेल. महाराष्ट्रांत जे चार दोन निष्ठावंत ग्रंथ संग्राहक आहेत, त्यापैकीं जुन्यांतले जुनें माझ्या माहितीप्रमाणें पोतदार आहेत. पुण्याला तुम्ही त्यांच्या घरीं गेला म्हणजे मुंबईच्या चोर बाजारांत प्रवेश केल्यासारखें तुम्हांला वाटेल, पण त्यांच्या संग्रहापैकीं एकादें पुस्तक आपणांस हवें असलें तर तें आपणांस पाहावयास सांपडेलच अशी मात्र बिलकूल खात्री मला देतां येत नाहीं !

ग्रंथालय शास्त्राचा आधुनिक पद्धतीनें ज्यांनीं अभ्यास केलेला आहे व या शास्त्रांतील प्राज्ञतेचा गरगरीत टिळा ज्यांच्या कपाळाला लागलेला आहे अशापैकीं ' डिप-लिबां ' चीही आपल्यामध्यें उणीव नाहीं मुंबई शहरामध्यें अमेरिकन सरकारनें जें ग्रंथालय स्थापन केलें आहे त्याचे सहकारी-ग्रंथी श्रीयुत ना म. केतकर किंवा आपल्या संघाचे एक उपाध्यक्ष श्रीयुत वि. गो. फाटक, हे मुंबई विश्वविद्यालयाचे भाषाशास्त्रविशारद तथा ग्रंथशास्त्रविशारदही आहेत. मद्रास युनिव्हर्सिटीचे ग्रंथ शास्त्र विशारद रा. बा. पु. कोल्हटकर हेही पण इकडचेच हें नुकतेंच कळलें. अशासारख्यांची खरें म्हटलें असतां आजच्या अध्यक्षस्थानीं योजना व्हावयास हवी होती. परिषदेच्या अध्यक्षाला आपले भाषण करून बैठक संपल्यावर उपरणें झाडून मोकळें होतां येणार नाहीं. परिषदेमध्यें जे संकल्प केले जातात ते पुढची परिषद होईपर्यंत सिद्धीस नेण्याबद्दल सतत खटपट करणें हें त्याचें कर्तव्य आहे. राष्ट्रीय परिषदेच्या अध्यक्षांवर अशी जबाबदारी असतें. माझी जन्मभूमि जरी कुलाबा जिल्हा नसला तरी पण त्याच्या बद्दल मला आदर आपल्यापेक्षां कमी आहे, असें मात्र कोणी समजूं नये. शिवाजीनें आपल्या राजधानीकरितां रायगड जो पसंत केला तो आपल्या जिल्ह्यांत आहे, ही एकच गोष्ट कोणत्याही महाराष्ट्रियाला आपल्या जिल्ह्यासंबंधी आपुलकी व आदर वाटण्यास पुरेशी आहे मला जरी आपल्या जिल्ह्यांतील ग्रंथालयाचें प्रत्यक्ष कार्य करतां न आलें तरीपण आजच्या संमेलनात आपण पसंत करणार ते ठराव आपण कृतींत येण्याबद्दल काय खटपट करतां, याकडे माझें सतत लक्ष राहील.

आपल्या जिल्ह्यांतील ग्रंथालय परिषद अशी आजची जरी ही पहिलीच असली, तरी ग्रंथालयें आपल्याला नवीन नाहींत. गेल्यासालीं मुंबईला भरलेल्या ग्रंथालय परिषदेच्या वेळीं भरलेल्या दुर्मिळ ग्रंथ प्रदर्शनाच्या उद्‌घाटन प्रसंगीं केलेल्या भाषणांत, आपल्याकडे नव्या पद्धतीच्या या लायब्ररींची सुरवात १८३७ सालीं कॅप्टन फ्रेंच यानें नगर येथें केल्याचें मीं सांगितलें. मुंबईमध्यें १८४५ सालीं तद्देशियां-करितां पहिली लायब्ररी स्थापिली गेली. आपल्या जिल्ह्यांत ती केव्हां सुरू झालीं तें पाहूं. गोविंद बाबाजी जोशी नांवाच्या एका चळवळया गृहस्थानीं आपली रोजनिशी लिहिलेली उपलब्ध आहे. त्यांत तो लिहितो, " ता. ९ माहे आक्टोबर सन १८६७ रोजीं संध्याकाळीं भाऊसाहेब बिवलकर यांचे खासगत लायब्ररींत सभा झाली......अलिबाग येथें दोन लायब्ऱ्या आहेत एक बिवलकरांची व एक गांवकऱ्यांची. बिवलकरांनीं सर्व खर्च आपण सोसून गांवकरी लोकांकरितां लायब्ररी खुली ठेविली आहे, व दुसरी गांवकऱ्यांची लायब्ररी आहे ती वर्गणीनें चालत असते."

ही जी गांवकऱ्यांची लायब्ररी ती अलिबाग 'नेटिव जनरल लायब्ररी' असावी. ही लायब्ररी १८६६ सालीं स्थापन झालीं, असें गॅझेटियरवरून दिसून येतें. ज्या वेळीं गॅझेटियर लिहिला गेला, त्यावेळीं म्हणजे १८८० मध्यें आपल्या जिल्ह्यांत कोठें कोठें लायब्ऱ्या होत्या त्यांची माहिती पहा:—

| स्थापन काल | स्थल | शेरा—१८७९–८० साली |
|---|---|---|
| १८६६ | अलिबाग | सतरा सभासद २५९ पुस्तकें, ५ देशी वृत्तपत्रें व २ मासिकें. मासिक वर्गणी ४, २, १, ½ शिलिंग |
| १८६६ | पेण | १८० पुस्तकें, ९ वृत्तपत्रें, ३ मासिकें मासिक वर्गणी, २, १, ½ शिलिंग. |
| १८७४ | महाड | दोन देशी वृत्तपत्रे-मासिक वर्गणी १, ½, ¼ शिलिंग. पुस्तकें थोडीं |
| १८७८ | तळें | पांच मराठी वृत्तपत्रें, एक मासिक. वार्षिक वर्गणी, ५, ३, १ रुपया |
| १८७८ | रोहा | एक आंग्लो व्हर्न्याक्युलर पत्र |

आपल्या जिल्ह्यातील पांच तालुक्यातील वाचनालयांचा हा आरंभ आहे. नदीप्रमाणें कोणतीही संस्था किंवा चळवळ उगमाशीं लहानच असते; परंतु पुढे तिला गंगेप्रमाणें विराट स्वरूप प्राप्त व्हावें, अशी अपेक्षा आहे. आपल्या जिल्ह्यामध्यें ग्रंथसंग्रहालय चळवळीला आरंभ होऊन ऐंशीं पाऊणशें वर्षें झाली. या काळांत आपल्याकडे ग्रंथसंग्रह प्रचंड व्हावयास पाहिजे. पण त्याकाळचे हे पंचप्रवाह अखंड चालू आहेत कीं, शुष्क होऊन आटून गेलें हें आपणच सांगू शकाल. माझी कल्पना आहे कीं सध्या अस्तित्वांत असलेली आपल्याकडील ग्रंथालयें नवीं असावींत, जुनी नामशेष झालीं. पण बिवलकरांचा ग्रंथसंग्रह अद्याप शिल्लक असल्यास तो आपण मिळविण्याचा प्रयत्न करावा. कारण त्यांत आपणास दुर्मिळ अशी पुस्तकें मिळतील उत्कृष्ट ग्रंथसंग्रहालयाची निर्मिती अखंड अनेक वर्षांच्या प्रयत्नाने हळुंहळूं होत असते. एकादा नवकोटनारायण जरी आपणास प्रसन्न झाला तरी तुम्हीं ग्रंथालयाची प्रचंड इमारत उभारूं शकाल, परंतु आंतील ग्रंथसंग्रह आपणास गोळा करतां येणार नाहीं. मिस्टर जॉन हिलबर्टन म्हणतो—

"A great Library cannot be constructed- it is the growth of ages. You may buy books any time with money, but you cannot make a library like one that has been a century or two a-growing, though you had the whole national debt to do it with."

पन्नाशीं वर्षामागें आपल्याकडें स्थापन झालेल्या लायब्ऱ्या जर त्यांतील संग्रहाला गळती न लागतां अखंड जोमाने चालू राहात्या तर आज केवढें प्रचंड स्वरूप त्यांला प्राप्त झालें असतें! सगळया महाराष्ट्रानें अभिमानानें आपल्या या संग्रहाकडे पाहिले असतें, व महाराष्ट्रांतील अभ्यासकांनी आपल्या जिल्ह्यांत धांव घेतली असती. आज आपण ग्रंथ विकत घेऊं म्हटलें तर अलिकडची प्रकाशनें आपणास हवीं तितकी मिळू शकतील. परंतु ज्ञानप्रसारक, सर्वसंग्रह, विविधज्ञानविस्तार, निबंधमाला अशासारख्या मासिकांचीं जुनीं वर्षे, कॅरेनें छापलेले ग्रंथ, छत्र्यांची इसापनीति व बालमित्र, तुकारामाचा गाथा, माडगांवकराची ज्ञानेश्वरी, काव्यसंग्रहाचे मुक्तेश्वरी आदिपर्व, माडगांवकरांचें मुंबई वर्णन, लोकहितवादीचा निबंध संग्रह, विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यांचा वेदोक्त-धर्म-प्रकाश, शास्त्री मंडळाचा महाराष्ट्र अशी पुस्तके उपलब्ध होणे कठीण आहे अशीं कांहीं मराठी पुस्तकें आहेत की तीं प्रकाशित झाल्याचे उल्लेख सांपडतात, परंतु तीं प्रत्यक्ष पहावयाचें सोडाच परंतु तीं अमुक ठिकाणी आहेत, हें देखील निश्चित करतां येत नाहीं. केवळ केवढीही संपत्ती असली तरी संपूर्ण ग्रंथसंग्रह करतां येत नाहीं, याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे ब्रिटिश म्युझियम होय. पॅरीस येथील इंपीरियल लायब्ररीमध्यें अशी लक्षावधी पुस्तकें आहेत कीं जी ब्रिटिश म्युझियममध्यें नाहींत. याचें कारण पॅरीस लायब्ररी ही ब्रिटिश म्युझियमपेक्षां वयानें वडील आहे. पॅरिसच्या इंपिरियल लायब्ररीची स्थापना चवदाव्या शतकांत झाली तर ब्रिटिश म्युझियमचा जन्म अठराव्या शतकांतला आहे. Sir Hans Sloane या एका व्यक्तीनें जमविलेल्या पन्नास हजार ग्रंथसंग्रहाच्या पायावर ब्रिटिश म्युझियमची उभारणी झाली पुढें तिसऱ्या जॉर्जनें इंग्लंडांतील राजघराण्याच्या ग्रंथसंग्रहाची त्यांत भर घातली. त्यानंतर कितीतरी ग्रंथ-संग्राहकांनीं आपले वैयक्तिक संग्रह त्यांत ओतून आजचें विराट् स्वरूप या संग्रहाला प्राप्त झालें आहे. इंग्रजी साम्राज्याची सारी संपत्ती या संग्रहाच्या पाठीशी उभी असतां पॅरीस इंपिरियल लायब्ररीशीं बरोबरी करणें ब्रिटिश म्युझियमला अशक्य आहे. याचे कारण मुद्रण कलेचा जन्म होण्यापूर्वीपासून पॅरिस इंपिरियल लायब्ररी अस्तित्वांत असल्यामुळें जसजसीं पुस्तकें प्रसिद्ध झाली तसतसीं तीं या संग्रहांत जमा होऊं लागलीं.

पाश्चात्य देशामध्यें जुन्या ग्रंथाला लोक किती चाहतात, याची माहिती माझ्या मुंबईच्या भाषणांत मी दिली आहे. हें भाषण छापून प्रसिद्ध असल्यामुळें मी त्याची पुनरुक्ति करूं इच्छित नाही. परंतु परवांच माझ्या एका मित्राकडून मी गोष्ट ऐकिली ती आपणास सांगण्याचा मोह मला आवरत नाही. हा माझा मित्र मूळ बंगाली असून मुंबईत त्याचें सेंकडहँड पुस्तकाचें एक दुकान आहे. तेव्हां त्यानें सांगितलेली गोष्ट केवळ गप्प आहे असें मानण्याचें कारण नाहीं. इंग्लंडांतील लोकांनी ज्यावेळीं अमेरिकेंत प्रथम वसाहत केली त्यावेळीं त्यांनी एक मासिक सुरू केलें. या मासिकाची आरंभीचीं दोनतीन वर्षे उपलब्ध नव्हती. जगांत कोठेंही या मासिकाच्या या व्हाल्युमचा शोध लागत नव्हता. ही गोष्ट माहीत असलेल्या एका अमेरिकन ग्रन्थ लुब्धकाला ( Book hunter ) मुंबईच्या जरीपुराणा दुकानांतील धुळीत या मासिकाची जुनी बांधलेलीं पुस्तकें अवचित दृष्टीस पडली. त्या पाहून त्याला फार आनंद झाला व त्यांची किंमत काय घेशील असा त्या मुसलमानाला त्यानें प्रश्न केला. आपल्यापैकी एकादा अनोळखी त्या अमेरिकनच्या जागी असता तर त्यानें चारपांच आण्यापेक्षां जास्त किंमत मागितली नसती. कारण त्या दिवसांत रद्दीला आतांच्यासारखा भाव नव्हता. मी किंवा रा. शंकरराव दाते यांसारखा ग्रंथनादी म्हणून त्या लोकांना परिचित असलेला माणूस असता तर त्या व्यापाऱ्यानें फारतर चारपांच रुपये सांगितले असते. त्या अमेरिकन माणसाची आशाळभूत दृष्टि आणि गोरा रंग पाहून त्या धूर्त मुसलमानानें आपली स्वार्थी वृत्ति शक्य तितकी ताणून पंधरा रुपये मोल जाहीर केलें ! हेतु हा कीं पंधरा नाहीं, चारपांच रुपये तरी मिळतील ! त्या अमेरिकनानें त्या मुसलमानाला तीं पुस्तकें घेऊन आपल्या निवासस्थानी नेलें व त्याच्या पदरांत गुपचूप पांच हजार रुपये टाकले ! आपल्या पुढ्यांत पडलेला हा पैशांचा पाऊस पाहून तो मुसलमान आश्चर्य चकित झाला. हा साहेब आपली थट्टा तर करीत नाहींना, अशीही त्याला शंका आली. त्याची ही भांबावलेली वृत्ति त्या अमेरिकनच्या दृष्टीस आल्याखेरीज राहिली नाहीं. "चल घेऊन जा. ही रक्कम मी तुला मोठ्या राजीखुषीनें देत आहे. या पुस्तकांकरितां जर तूं माझ्याकडे दहा हजार रुपये मागितले असतेस तर तेही मी तुला इतक्यांच आनंदानें दिले असते," असें बोलून हा वाङ्मयठेवा मिळवून दिल्याबद्दल त्याचे आभार मानले व हस्तांदोलन करून त्याला निरोप दिला. कांहीं वर्षांपूर्वी 'वसंत विलास' या गुजराती प्राचीन काव्याचें सचित्र हस्तलिखित चवदा हजार रुपयांना एका अमेरिकन गृहस्थानें खरेदी केलें. याच्या मूळ मालकाची हें हस्तलिखित देशाबाहेर जावें, अशी मुळींच इच्छा नव्हती. असें असतां त्याला आपला देश कसा

आंचबला यांचा दुर्दैवी इतिहास मला उघडपणें येथें सांगता येत नाहीं. आपल्याकडेही अशा ग्रंथाचे महत्त्व ओळखणारे अगदींच लोक नाहींत, असें नाहीं. शेख सादीच्या गुलिस्तान या सुप्रसिद्ध ग्रंथाचे सोळाव्या शतकांतील एक सचित्र हस्तलिखित १९४५ च्या अक्टोबरमध्यें सर कावसजी जहांगीर यांनीं मुंबईमध्यें साडेपांच हजार रुपयांना विकत घेतलें वास्तविक हे हस्तलिखित होतें हैद्राबाद येथील एका सेवानिवृत कस्टम खात्यांतील अधिकाऱ्याच्या संग्रहांतलें. तिकडून कोणातरी ग्रथशर्विलकानें तें उचलून मुंबईला आणून विकून टाकलें ! हें प्रकरण कांहीं महिन्यापूर्वी कोर्टापुढे येऊन त्याची हकिकत The Times of India वगैरे पत्रामध्यें प्रसिद्ध झालीं होती जुन्या दुर्मिळ ग्रंथाचें महत्व केवढें आहे, याची कल्पना आपणास येण्याकरितां ही माहिती आपल्यापुढें ठेवलीं आहे.

ग्रंथांविषयीं किंवा ग्रंथसंग्रहाविषयीं आपली आवड नवीन नाहीं. ती फार प्राचीन काळापासूनची आहे. जुन्या ग्रंथभांडाराची मी आपणास गोष्ट सांगत नाहीं. अगदीं अलिकडेपर्यंत म्हणजे मुद्रणकला सुरू झाली तेव्हां देखील जुन्या ग्रंथासंबधीं आपल्या लोकामध्यें आस्था होती. केवळ ब्राह्मणांमध्येंच नव्हे तर इतर जातीमध्येही होती. प्रसिद्ध व्याकरणकार दादोबा पांडुरंग आपल्या बालपणच्या आठवणी सांगतांना मुंबईच्या भाई नांवाच्या परभासंबंधी लिहितात " ते पाताणे परभू असून, वैष्णवाप्रमाणें कानशिलावर मुद्रा लावित असत व मीं असें पाही कीं निरंतर यांचें येथें प्राकृत पोथ्या लिहून घेण्याचा मोठा कारखानाच असे. सतत एक दोन लेखक यानीं कित्येक वर्षे ठेविले होते, व त्यांच्या हातून पुष्कळ प्राकृत ग्रंथ सुंदर अक्षरांनी सुंदर कागदावर लिहून मोठ्या फरमाचे सांचे करून त्यांस वरखालीं जरीच्या बुट्यांची पुष्टिपत्रें लावून वर लाकडांच्या फळया त्याच सांच्याच्या ठेवून तो रुमालांत लांब फितीनी बांधून मोठ्या जतनेने तयार करीत. जो प्राकृत ग्रंथ म्हटला तो याप्रमाणें तयार केलेला यांच्या संग्रहीं असे. हे गृहस्थ ग्रंथाचे फारच शोकी असत स्वतः कागदाचे सांचे कापावे, दोरीच्या फळयावर रेखाटावें, त्यांच्या समासावर वेलबुट्या काढाव्या इतकें काम हे स्वतः करीत असत. यांचा कित्ता घेऊन आमच्या तीर्थरूपांनींही आपल्या शक्तीप्रमाणें बराच प्राकृत ग्रंथांचा संग्रह केला होता. प्रसिद्ध हरिविजय, पंढरीमाहात्म्य, शिवलीलामृत हे ग्रंथ त्यांनीं माझ्या जाणतेपणाच्या अगोदर पूर्वीच लिहून ठेवले होते व मीं जेव्हां सुमारें दहाबारा वर्षांचा होतों तेव्हां त्यांनीं भक्तिविजय व दासबोध हे ग्रंथ लिहविले ! " ही हकिगत १८२०–२५ सुमाराची आहे व मुंबईतील पहिला उपलब्ध मराठी ग्रंथ १८२३ मधला आहे १८२० सालीं लेफ्टनंट टी. बी. जर्विस यानें दक्षिण कोंकण म्हणजे सध्यांचा कुलाबा व रत्नागिरी जिल्हा यांची शैक्षणिक पाहाणी करून सरकारला जें निवेदन सादर केलें आहे त्यांत दक्षिण कोंकणांतील हिंदु वाङ्मयासंबंधी तो लिहितो,

"The Sanskrit works are easily obtained, and there are yet a few Brahmins, who understand the most obstruse writings; but the great falling off in the condition of this class, who used in some way or other to find a livelyhood under the former Government, but almost led to the total neglect of learning. Its attention is now directed rather to agricultural persuits, and the petty offices under our government, either in the Revenue and judicial line, and for these occupations, a very moderate stock of knowledge is considered requisite

The Hindoo have also a variety of works in the vernacular language either commentaries or the translations of the Purans, Tales, Dramas and Scientipic works, or short interesting histories originally written in Mahratta language: of these last, there are many which appear well worthy the attention of Government when printing books for the use of schools, and I am ready to submit several for inspection, should it be thought advisable to introduce them in the schools"

बाबा पदमनजी (जन्म १८३१) या कासार जातीच्या गृहस्थानें आपण लहान असतांना आपणांस प्राकृत ग्रंथ वाचण्यास हरिदास कसा ठेवला होता व त्यांत आपली थोडी गति झाल्यावर आजूबाजूच्या अब्राम्हण जातीच्या आयाबायाही पुराण श्रवणास कशा येत याचे आत्मचरित्रांत मोठें मजेदार वर्णन केले आहे. तो पुढें लिहितो "हे ग्रंथ त्या काळांत छापले नव्हते व ते मिळविणें कठीण पडे. आमच्या घरीं ज्या पोथ्या नसत त्या दुसऱ्याच्या मागून आणाव्या. समग्र ग्रंथ कोणी एकदम देत नसत. थोडथोडे अध्याय आणून वाचून परत करावे अशी चाल होती. आमच्यापाशीं हरिविजयाचा ग्रंथ होता तो पंधरा रुपयांस घेतला होता. त्याचें अक्षर फार सुंदर होतें. आतां (म्हणजे १८८८ च्या सुमारास) हा (छापील) ग्रंथ एक रुपयाला मिळतो" हे बाबा पदमनजी पुढें ख्रिस्ती धर्मांत गेले हें आपणांस माहीत असेलच.

जुन्या काळचे हे हरिदास, पुराणिक किंवा घरोघरीं पोथ्यापुराणें वाचणारे लोक त्या काळचीं फिरतीं ' बोल ग्रंथालयेंच ' होतीं. आज जें रेडियो काम करतो तेंच हे लोक त्याकाळीं कार्य करीत असत. वाचनापेक्षां श्रवणाचा परिणाम जास्त टिकाऊ असतो. या त्या काळच्या निरक्षरांना आपली परंपरा, इतिहास व संस्कृति यांची माहिती आजच्या कांही बी ए., एम् ए. पेक्षां जास्त असे. शिवाजी महाराजानीं राष्ट्राभिमानाची स्फूर्ति या श्रवणद्वाराच मिळविली नव्हती काय ? आपल्याकडे मुद्रणकला अस्तित्वांत आल्यापासून ग्रंथसंरक्षणासंबंधीं एका प्रकारची बेफिकीर वृत्ति आपल्या लोकामध्यें संचरली घरोघरीं नळाचे पाणी येऊं लागल्यापासून जसें किती पाणी सांडून वाया जाते याची पर्वा नाहीशीं झाली आहे तशी छापील ग्रंथाचा शिरकाव घरांत झाल्यापासून ग्रंथसंग्रहाविषयीं व त्यांच्या रक्षणाविषयीं आम्हीं अक्षम्य रीतीनें निष्काळजी बनलों आहों त्यामुळें जुने छापील व विशेषतः प्राचीन हस्तलिखित ग्रंथ झपाट्यानें लुप्त होऊं लागले आहेत. ज्यावेळीं शंभर सवाशें फूट खोल विहिरींतून बायकांना दोरीनें पाणी काढावे लागें त्यावेळीं तांब्याभर पाणीं तोंड धुण्यास पुरें होत असें, पण आतां तासभर नळ उघडा टाकूनही पूर्वीसारखें तोंड स्वच्छ होत नाहीं ! हीच स्थिति छापून सुलभप्राप्त झाल्यापासून ग्रंथांची झाली आहे !

मुद्रणकलेचा प्रवेश युरोपामध्यें पंधराव्या शतकाच्या पूर्वार्धामध्यें झाला. या शतकांत म्हणजे पंधराशेंपर्यंत जीं पुस्तकें मुद्रित झालीं त्यांना युरोपामध्यें Incunabula असें नांव देतात. cunae म्हणजे लॅटिन भाषेंत पाळणा. पाळण्याला आपल्या संस्कृत भाषेंत दोला असें नांव आहे. तेव्हां Incunabula याला दोलामुद्रित असें नांव द्यावें असें मी मुंबईच्या व्याख्यानांत सांगितलें. पण युरोपांतील Incunabula ची १५०० ही मर्यादा आहे, त्याप्रमाणें आपल्या दोला मुद्रिताची मर्यादा कोणती ठरवावी हा प्रश्नच आहे गोव्यामध्यें मुद्रणकलेचा प्रवेश १५५६ सालीं झाला व या ठिकाणीं ख्रिस्त पुराण हा फादर थोमस स्टिफन्स यानें लिहिलेला मराठी ग्रंथ १६१६ सालीं रोमन लिपीमध्यें मुद्रित झाला पुढें कलकत्त्याजवळ श्रीरामपूर येथें डॉ. कॅरे यांनीं १८०५ सालीं मराठी ग्रामर, १८१० सालीं मराठी – इंग्रजी कोश, १८१४ सालीं सिंहासनबत्तिशी, १८१५ सालीं हितोपदेश असें कांहीं ग्रंथ मुद्रित केलें. हाच खरा मराठी मुद्रणाचा आरंभ मानला पाहिजे मराठी मुद्रणाची सुरवात महाराष्ट्रांत न होतां श्रीरामपूर सारख्या बंगालमधील दूरस्थ भागांत कां झाली तें सांगतों.

हिंदुस्थान इंग्रजांच्या सत्तेखालीं आला, पण या अधिकाऱ्यांना प्रजेची भाषा माहीत नसल्यामुळें त्यांचे अन्तःकरण व सुखदुःखें राजकर्त्यांना कळत नाहींत, म्हणून जे सिव्हिल सर्वंट हिंदुस्थानांत येतात त्यांना हिंदी, बंगाली, मराठी, तामील वगैरे देशी भाषांचें शिक्षण देण्याची आवश्यकता मार्क्विस ऑफ वेलेस्ली ( १७९८–१८०५ ) या गव्हर्नर जनरलच्या प्रथम लक्षांत आली. याकरितां त्यानें १८०१ मध्यें कलकत्ता येथें एक कॉलेज स्थापन केलें. एखाद्या सिव्हिलियनची कोणत्याही प्रांतामध्यें नेमणूक झाली तरी त्यानें हिंदुस्थानांत आल्याबरोबर प्रथम कलकत्ता येथें या कॉलेजांत त्या प्रांताच्या भाषेचें शिक्षण घेऊन नंतर आपल्या नोकरीवर रुजू व्हावें, असा नियम केला त्यावेळीं या विदेशी अधिकाऱ्यांना मराठी भाषेचे शिक्षण देण्याकरितां म्हणून या भाषेचें शिक्षक डॉ. कॅरे यानें हीं पुस्तकें मुद्रित केलीं मुंबईमध्यें मिशनऱ्यांनीं मुद्रणाला सुरवात केली व १८१७ साली मॅथ्यूचें शुभवर्तमान छापल्याचें सांगतात (The Oriental christion spectator, 1847, p. 171) पण आज मुंबईतील पहिलें मुद्रित मराठी पुस्तक म्हणजे १८२३ सालचें विदुर–नीति हेंच होय. तेव्हां मराठी मुद्रणाचा आरंभ १९ व्या शतकाच्या आरंभीं हे निश्चित झालें. परंतु युरोपांत दोलामुद्रितांची मर्यादा जशी १५०० ही मानतात, त्याप्रमाणें आपल्याकडें कोणती मानावी, हें निश्चित झालेलें नाहीं. मुंबईच्या दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनाचें वेळीं १८५० ही मर्यादा घालावी असें मी मत प्रदर्शित केलें होतें. पण त्यांत दुरुस्ती करावी, असें मला वाटत आहे. कारण ही जी मर्यादा ठरविली त्यावेळीं मराठीखेरीज इतर भाषा मी लक्षांत घेतल्या नव्हत्या. मराठीप्रमाणें मी अलिकडे गुजराथी वाङ्मयाच्या इतिहासाकडे व अभ्यासाकडे अल्पस्वल्प लक्ष देत आहे. या भाषेच्या मुद्रणाची सुरवात पारशी लोकांनीं केली व गुजराथी लोक फारच उशीरां या क्षेत्रांत शिरले. अहमदाबाद येथील गुजरात–व्हर्न्याक्युलर सोसायटींतील ग्रंथांची तपासणी करतां १८५० पर्यंत मुद्रित गुजराती ग्रंथ आधींच कमी आणि ते सर्व पारशी लोकानीं लिहिलेले दिसले. खुद्द गुजराती लोकांनीं लिहिलेले हाताच्या बोटांनी मोजण्याइतके मिळण्याची पंचाईत पडते. शिवाय १८६७ सालीं पुस्तकासंबंधीचा २५ वा ॲक्ट पास झाला. या कायद्याप्रमाणें प्रत्येक छापील पुस्तकाच्या तीन प्रती सरकारकडे जाऊं लागल्या व या प्रकाशनाच्या याद्या प्रसिद्ध होऊं लागल्या. लवकरच जीं आपलीं मध्यवर्ति किंवा प्रादेशिक ग्रंथालयें सुरु होणार आहेत त्यांत १८६७ पासूनचेच ग्रंथ ( तेही शिल्लक असल्यास ) जमा होतील. त्यापूर्वीचें ग्रंथ तेथें सांपडणार नाहींत. याही दृष्टीनें १८६७ साल ही दोलामुद्रितांची कालमर्यादा जास्त ग्राह्य वाटते. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाची गुंजीकर व्याख्यानमाला सुरू झाली त्यावेळींही हीच कालमर्यादा मी ठरविली होती. माझे मित्र मराठी

वाङ्मयसूचिकार रा. शंकरराव दाते यांनींही हीच दोलामुद्रितांची मर्यादा आतां मान्य केली असून त्याचप्रमाणें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत, 'दोलामुद्रितें' म्हणून पुस्तकें निराळीं काढून ठेवलेलीं आहेत तीं १८६७ पर्यंतचीं आहेत. बाकी आणखी दोनतीनशें वर्षांनीं १९०० हीच दीलामुद्रितांची मर्यादा ठरणार आहे. परंतु या सालाच्या अगदीं जवळ आम्ही असल्यामुळें ती स्वीकारणें आम्हांस कठीण वाटत आहे.

मराठी मुद्रणाची पाळण्यांतील वयोमर्यादा किंवा दोलावस्था आपण १८६७ ही ठरविली. एकदां या बालकाचे बारशें होऊन तें पाळण्यात निजल्यावर त्याला झोंके द्यावयाला ठिकठिकाणचे लोक पुढे आले हें खरें आहे परंतु आपणास ऐकून अभिमान वाटेल कीं, आरंभीच्या मुद्रणाच्या खस्ता प्रामुख्याने आपल्या जिल्ह्यांतील लोकांनीं काढलेल्या आहेत. आधुनिक मराठीला पायाभूत असलेला 'महाराष्ट्र भाषेचा कोश' ज्या पंडितानीं १८२९ साली तयार केला त्यांचे मुख्य जगन्नाथशास्त्री क्रमवंत हे आपल्या जिल्ह्यांतील अष्टागर प्रांती नागांव गांवांतील होते. अलीकडे हे घराणें टिल्लू या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यांचे मदतनीस गंगाधरशास्त्री फडके हेही याच गांवचे. या मंडळांतील परशुराम शास्त्री गोडबोले वगळले तर इतर म्हणजे रामचंद्र शास्त्री जान्हवेकर, दाजीशास्त्री शुक्ल हेही नागांवचेच असावेत अशीं माझी समजूत आहे. दादोबांच्याही पूर्वी पण त्याच म्हणजे १८३६ सालीं जें एक महाराष्ट्र भाषेचें व्याकरण प्रसिद्ध झालें त्याचे कर्ते कोशमंडळांतील एक गंगाधरशास्त्री फडके हे होते. त्यांनीं आपल्या व्याकरणावर "राहणार प्रांत अष्टागर महाल नागाव" असें स्पष्टच नमूद केलें आहे दादोबा पांडुरंग जरी ठाणे जिल्ह्यांतील होते तरी ते ज्यांच्याकडून व्याकरण शिकले ते त्याचे गुरु बापुशास्त्री शुक्ल मायदेव यांचेही मुख्य ठिकाण नागांव आहे दादोबांनीं त्यांच्या स्वभावाची व विद्वत्तेची आत्मचरित्रांत मुक्तकंठानें स्तुति केली आहे. शिक्षामंडळीचे 'सक्रतार' व आधुनिक मराठी भाषेचे जे जनक समजले जातात व ज्यांनी 'इसापनीति' 'बालमित्र' वगैरे ग्रंथाचीं सुंदर मराठी भाषांतरें केली ते सदाशिव काशीनाथ छत्रेही पण नागांवचे होते असें प्रो. गो. चि. भाटे लिहितात. पहिले शुद्ध मराठी पत्र ज्यांनीं सुरू केले व बाणेदारपणानें चालविले ते 'प्रभाकर' कर्ते भाऊ महाजन आपल्याच जिल्ह्यातील पेण तालुक्यांतील होते. मिशनरी लोकांना ज्यांनी यशस्वी रीतीनें टक्कर दिली ते विष्णुबुवा ब्रह्मचारी हेही आपल्या जिल्ह्यांतीलच होत. अशाप्रकारें आधुनिक कोश, व्याकरण, शुद्ध मराठी वृत्तपत्र, कथावाङ्मय, धर्म प्रचारात्मक वाङ्मय निर्माण करणारे आरंभीचे वाङ्मय सेवक आपल्या जिल्ह्यांतील होते. नेटिव एज्युकेशन सोसायटीचे सक्रतार जर्विस याने जे मराठी गणित विषयक ग्रंथ किंवा "विद्येने उद्देश, लाभ आणि संतोष" वगैरे जे ग्रंथ प्रसिद्ध केले ते सर्व जगन्नाथशास्त्री क्रमवंतांच्या साह्यानें होते, असें त्यानें बहुतेक प्रत्येक ग्रंथावर स्पष्टपणें नमूद केले आहे.

आपल्या जिल्ह्याच्या व मुद्रणविषयक प्रयत्नांच्या संबंधाविषयीं एक महत्वाची गोष्ट सांगावयाची राहिली. आपल्या जिल्ह्यांत जन्मलेल्या एका प्रसिद्ध पुरुषानें अठराव्या शतकाच्या अखेरीला गीता छापविण्याचा उद्योग सुरू केला होता. हा पुरुष म्हणजे बाळाजी जनार्दन उर्फ नाना फडणीस होय. यांचा जन्म आपल्या जिल्ह्यांतील वेळास येथें झाला होता हें आपणा सर्वांस माहीत असेलच. त्यावेळीं देवनागरी टाइप नव्हते. म्हणून त्यानें ब्लॉक तयार करावयाला लावले नाना फडणवीसांना पुढें वाईट दिवस आल्यामुळे त्यांच्या हयातींत हे गीतामुद्रणाचे काम पुरें होऊं शकले नाहीं. पुढें त्यानीं या कामाला योजलेल्या कारागिराकडूनच मिरज संस्थानचे अधिपति गंगाधर गोविंद पटवर्धन यांनी १८०५ च्या सुमारास हा उद्योग शेवटास नेला. सुप्रसिद्ध गणितज्ञ केरूनाना छत्रे हेही आपल्याच गांवचे. ही सर्व माहिती ऐकून आपणास अभिमान वाटेल. पण आपल्या पूर्वजांची हीं मराठी दोळामुद्रितें आपल्या जिल्ह्यांतील एकाद्या ग्रंथालयाच्या किंवा व्यक्तिच्या संग्रही आहेत काय? आणि तीं जर नसतील तर हीं गोष्ट आपणास लाजिरवाणी नाही काय, असा माझा आपणास सवाल आहे?

माझी आपणास अशी आग्रहाची सूचना आहे कीं, आपण आपल्या जिल्ह्यांतील घरोघर शोध करून ही पुस्तकें किंवा जुनीं हस्तलिखिते मिळाल्यास त्यांचा संग्रह व बचाव करावा. हीं पुस्तकें त्याच्या मालकांनीं जर आपल्या हवाली केली नाहींत तरी हरकत नाही त्यांची नोंद आपण करून ठेवावी व त्यांचे संरक्षण करण्याची त्यांना विनंति करावी. इतकें आपण केले तरी सध्यां पुरे आहे. शिवाय आणखीही एक गोष्ट आपल्या नजरेस आणावयाची आहे. ज्याप्रमाणें अनेक झरे किंवा नालें मिळून नदी निर्माण होते त्याप्रमाणें अनेक वैयक्तिक ग्रंथसंग्रहांचे सार्वजनिक ग्रंथसंग्रहालय बनत असतें. आपल्यापैकीं प्रत्येकानें जर ही ग्रंथसंग्राहकवृत्ति आपलीशी केली तर कांहीं काळानें आपणास एक उत्कृष्ट ग्रंथसंग्रहालय आपल्या जिल्ह्यांत अस्तित्वांत आणतां येईल. आपल्या शेजारीं मुंबईत जशी लोकसंख्या वाढत आहे त्याप्रमाणें मुंबईची जमीन वाढत नाहीं. आणखी कांहीं वर्षांनीं आपल्या या जिल्ह्यांत नवी मुंबई निर्माण करावी लागणार हे निश्चित आहे या पुढें सारें शिक्षण देशी भाषेंत होणार आहे. रत्नागिरी, ठाणें वगैरे जिल्ह्यांत कॉलेजें स्थापन झालीं आहेत. आपल्या जिल्ह्यांतही एक आर्ट कॉलेज व त्याच्याही पेक्षां आधीं एक शेतकी कॉलेज स्थापन करण्याच्या खटपटीला आपण लागलें पाहिजे. आपला जिल्हा कृषिप्रधान आहे. आपल्या जिल्ह्याला एकाकाळीं मोठेच व्यापारी महत्त्व होतें. चौलरेवदंडा ही बंदरें प्राचीनकाळीं प्रख्यात होतीं व ग्रीक वगैरे लोकांशीं आपलें व्यापारी दळणवळण होतें. टॉलेमी वगैरे जुन्या ग्रंथकारांच्या लिखाणांत आपल्या

जिल्ह्यातील निरनिराळ्या स्थळांचा निर्देश आढळतो. हें आपलें महत्त्व पुनः आपल्या जिल्ह्याला प्राप्त होणार आहे तेव्हां त्याची पूर्वतयारी आपणास आतांपासून करावी लागणार. या आपल्या भावी थोरपणाला शोभेल असें ग्रंथसंग्रहालय निर्माण करण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे. उत्कृष्ट ग्रथसंग्रहालय केवढीही संपत्ति असली तरी झटपट उभारतां येत नाही, तें हळुहळू निर्माण होतें. हे जें मी मघाशी सांगितलें त्याकडे पुनः एकदां आपलें मी लक्ष वेधतों.

मुंबईच्या माझ्या भाषणांत मी मुद्रणप्रवेश व Book collection म्हणजे ग्रंथसंग्रह कसा करावा, या विषयावर बोललों तें भाषण 'पचारती' या संग्रहांत छापून आपल्यापुढें आहे त्यामुळें या ठिकाणीं Book selection म्हणजे ग्रंथांची निवड कशी करावी हाच विषय प्रतिपादनार्थ घ्यावा, असें मी ठरविलें होतें. पण नमनालाच घडाभर तेल खर्च झालें ! आता राहिल्या वेळांत माझ्या पूर्व नियोजित विषयावर दोन शब्द सांगतों.

मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयामध्यें पुस्तकांची निवड हा जो प्रश्न तो फारसा त्रासदायक नसतो. संग्रहालय म्हटलें म्हणजे तेथें मराठीमध्यें प्रसिद्ध होणारें प्रत्येक पुस्तक, मग, ते लहान किंवा मोठें, बरें किंवा वाईट, सरस किंवा निरस, अश्लील किंवा गंभीर ठेवणे प्राप्त आहे. आमच्याकडे संग्रहालय व वाचनालय असें दोन विभाग आहेत. वाचनालय विभागांतील पुस्तक बाहेर वाचावयास दिलें जातें. संग्रह विभागांतले तशाच विशेष कारणाशिवाय सहसा बाहेर दिलें जात नाही. प्रत्येक पुस्तकाची या दोन विभागांकरितां म्हणून सामान्यतः आम्हीं दोन प्रती घेतों. विशेष लोकप्रिय पुस्तक विशेषतः ज्यांना ज्यास्त मागणी असते, अशा पुस्तकाच्या आम्ही चार प्रती देखील घेतों. तसेंच जर एकादें पुस्तक फक्त पुनर्मुद्रित किंवा अनिष्ट असलें तर ग्रंथसंग्रह विभागाकरितां आपण त्याची एकच प्रत घेतों. आमच्याकडे हजारावर सभासद असल्यामुळें प्रत्येक पुस्तकाची एक तरी प्रत घेणें आपणांला जड नाहीं. परंतु लहान ग्रंथालयें जेथे आहेत, तेथे निवड करण्याचा प्रश्न फारच संतापजनक होत असावा, अशी माझी समजूत आहे 'मागणी तसा पुरवठा' हें जर धंदेवाईक तत्त्व आपण स्वीकारलें तर केवळ कादंबऱ्या व लघुकथा वगैरे मनोरंजक पुस्तकें यांची खरेदी करावी लागेल, आणि ग्रंथालय स्थापण्याचा जो मूळ हेतू तोच फसला जाईल. सद्बोध व ज्ञानप्राप्ति हें वाचनाचें ध्येय आहे आपलें अन्न जसें शरीराचें पोषण करतें त्याप्रमाणें वाचनानें मनाचें पोषण व संवर्धन झाले पाहिजे रुचि हेंच असें भक्षणाचें ध्येय नाहीं

त्याप्रमाणें केवळ मनोरंजक हें वाचनाचें उद्दिष्ट असतां नये. त्यामुळें आपल्या मनावर विपरित परिणाम होणार नाहीं याबद्दल काळजी घेणें भाग आहे योग्य प्रमाणांत कादंबरीवाचन आणि तेंही चांगल्या अभिजात कादंबऱ्यांचें वाचन वाईट नाहीं. मराठी भाषेचे रामदास असें ज्यांस म्हणतात ते विविध-ज्ञान विस्ताराचे आद्य संपादक, रामचंद्र भिकाजी गुंजीकर हे रिसबूड यांच्या विश्वासराव या कादंबरीच्या परीक्षणांत लिहितात,—" कल्पनेच्या पुस्तकांची गरज गहन विषयावर मन गुंतून गेल्यामुळें ज्यावेळीं त्यास आलस्य येतें त्यावेळीं तें घालवून त्यास पुनः चेतना देण्याकरितां आहे. किंवा जेव्हां सांसारिक अनेक अडचणींनीं किंवा दुखण्यानें मन गंभीर विषयांच्या अभ्यासास अपात्र होतें त्या वेळेस अशा पुस्तकांचा उपयोग होतो परंतु सर्वकाळ कल्पित गोष्टी वाचण्याची एकदा सवय लागली म्हणजे विचार शक्तीस विशेष ओढा न बसल्यामुळें इतर विषय ग्रहण करण्यास जितकें स्थैर्य व एक चित्तपणा आणावा लागतो तितका येत नाहीं "

स्वतः गुंजीकर हे उत्कृष्ट कादंबरीकार होते, हें त्यांची मोचनगड व गोदावरी या कादंबऱ्या पाहिल्या असतां कळून येईल ' मराठी भाषेचे शिवाजी ' निबंधमालाकार धाकटे चिपळूणकर यांचें या संबंधी काय मत आहे पहा इतिहास या आपल्या निबंधात शास्त्रीबुवा म्हणतात, " मन बिघडणें हा कादंबऱ्यापासून होणारा एक अनर्थ आहे. दुसरा अनर्थ मनाचें दौर्बल्य. कादंबऱ्याच वाचनाची ज्यास एकदां चटक लागते त्यास मग दुसरें कांहींच वाचावेसें वाटत नाहीं कादंबऱ्या भराभर वाचावयाच्या, व त्यांत समजण्यासहि कांहीं कठिण नसतें; वास्तव विद्या काय ती हीच असें वाचणारास वाटूं लागून त्याहून वरच्याढ जे शास्त्रीय वगैरे ग्रंथ त्यांच्या त्यास त्रासच होऊं लागतो. त्यांत शिकणारानें आपली मति शिरकवावी लागते, कारण ते कठिण व गहन विषय पडले; पण तें यांच्यानें होत नाहीं. अशी एकदां संवय पडून गेली म्हणजे मग ती कधींहि मोडतां येत नाहीं. याप्रमाणें बाजवीपेक्षां जास्त असा हा कादंबऱ्यांचा नाद लागला असतां तो मनास अपाय करतो. तें अगदीं निःसत्व होऊन कोणतेंहि श्रमाचें काम त्यास झेंपेनासें होतें. "

कादंबरी वाङ्मयाच्या वाचनासंबंधी आपल्याकडील दोघां प्रसिद्ध पुरुषांचें मत सांगितलें. आतां पाश्चात्य लोकांचें त्यासंबंधी काय म्हणणे आहे तें पाहू. खालच्या दर्जाच्या अशा पुस्तकांना उद्देशून शोपनहार म्हणतो,

" Sush books rob the public of time, money and attention which ought properly to belong to good literature and noble aims and they are written with a view merely to make money and occupation. They are not merely useless, but injurious. Nine tenth of our current literature has no other end but to inveigle a thaler or two out of the public pocket, for which purpose author, publisher and printer are leagued together. A more perniceious, subtler and bolder piece of triekery is that by which penny-a-liners and seribblers seemed in destroying good taste and real culture. " कार्लाईलनें, " The true university of these days is a collection of Books " असें म्हटलें आहे, पण याचवेळीं " The wretchedest circulating-library novel which foolish girl thumb and can in remote villages " असें या वाङ्मयाचें धिक्कारानें वर्णन केलें आहे Richard Baxter नाटकें कादंबऱ्या व लघुकथा यांचा तरुणावर होणाऱ्या वाईट परिणामाचें वर्णन करतांना म्हणतो—" They are powerful baits of the devil, to keep more necessary things out of their minds, and better books out of their hands and to poison the mind so much the more dangerously, as they are read with more delight and pleasure "

कादंबऱ्यामुळें लोकांचें इतर वाचनाकडे लक्ष जातें ही जी कल्पना ती खोटी आहे उलट इतराकडे असलेलें उडून जातें एक दोन वर्षांमागें कामगार लोकामध्यें वाचनाची हौस निर्माण करण्याकरितां " कादंबरी केंद्र " म्हणून परळ येथें एक वाचनालय स्थापण्याचा आमच्या कांहीं मित्रांनी प्रयत्न केला होता, त्याच्या मुळाशीं हीच भोळी आशा होती वास्तविक हा एक कामगारांकरितां 'वाङ्मयाचा गुत्ताच' ते उघडणार होते ! Novel या इंग्रजी शब्दाला बंगाली व हिंदीमध्यें 'उपन्यास' अस प्रतिशब्द रूढ आहे. गुजराती भाषमध्यें Novel ला नवलकथा म्हणतात. मराठीमध्यें 'कादंबरी' हा जो शब्द रूढ केला तो मोठा मार्मिक व अन्वर्थक वाटतो कारण मद्याचेंच कादंबरी हें दुसरे एक नांव आहे !

केवळ कादंबरीलाच मागणी जास्त असते म्हणून तेथें अशा प्रकारच्याच पुस्तकांचा पुरवठा केला गेला तर मग ही Public Library नसून Public House म्हणजे Tavern–दारूचें दुकान होईल ! Public Libraries if the right books are in them will be of immense value But we read more and more now a days for amusement and the most absurd books are the most popular' असें Mr J. A. Froude यानें म्हटले आहे जें वाङ्मय लोकप्रिय (Popular असतें तें चांगलें असतेंच असें नाहीं. आपणास तें आवडतें याचा अर्थ आपली अभिरुचि बिघडलेली असते. शिवाय प्रथितयश व ख्यातनाम साहित्यिक म्हणून जे लोक आज काल मिरविले जातात त्यापैकीं कांहीं तर शुद्ध वाङ्मयकलाल असतात. डि क्किन्सीनें वाङ्मयाचे, The Literature of power आणि The Literature of Knowledge असें दोन भेद पाडलेले आहेत. उत्कृष्ट ध्येयवादी कादंबरीचा या भेदांमध्यें समावेश होऊं शकेल, परंतु सध्यां भाराभर प्रसिद्ध होणाऱ्या गचाळ कादंबऱ्या, लघुकथा व नाटकें हीं कोणत्या वर्गांत घालावीत, असा मला एकेकाळीं विचार पडला होता. परंतु गटेनें हें माझें कोडें सोडविलें. त्यानें या वाङ्मयाकरितां तिसराच एक वर्ग निर्माण केला आहे. तो म्हणजे The Literature of despair हा होय Zelter याला लिहिलेल्या एक पत्रांत गटे लिहितो, "In the whirlpool of literature of the day I have been dragged into the bottom-less abyss of horrors of the recent French Romance literature I will say in one word–it is a literature of despair." वाङ्मयाचा व राष्ट्रोत्कर्षाचा अत्यंत निकट संबंध आहे. रामदास तुकारामाच्या वाङ्मयघोषाच्या वातावरणांत शिवाजीसारखा सच्छीलवीर निर्माण होऊन त्यानें स्वराज्य मिळविलें आणि शृंगारिक लावण्याच्या चित्कारात शेवटच्या बाजीरावासारखा विषयलंपट व नादान माणूस उद्‌भूत होऊन त्यानें ते धुळीला मिरविले. याचें कारण रामदासाचे वाङ्मय The literature of Power म्हणजे 'समर्थ वाङ्मय' होतें व लावणी-वाल्यांचे वाङ्मय "The literature of despair" म्हणजे "अनर्थवाङ्मय" आहे. दिवसभर शारीरिक किंवा मानसिक कष्ट करून थकलेला भागलेला शेतकरी, गिरणीकामगार, कारकून किंवा व्यापारी यांनीं काय गंभीर विषय वाचावें; त्यांच्या मनाचा किंवा शरीराचा थकवा जावयाला व प्रापंचिक विवंचनांचा विसर पाडावयाला

कादंबरी सारखेच उत्तेजक वाङ्मय त्यांना मिळावयाला नको काय? असा कादंबरीच्या पुरस्कर्त्यांचा सवाल असतो. दारूबंदी विरुद्ध ओरड करणारे मदिरा प्रेमी तरी यांपेक्षां निराळें दुसरें काय विचारतात? अशा प्रकारच्या प्रश्नाला ग्लॅडस्टननें Bachley Insti'ute and Reading room पुढें केलेल्या एका भाषणांत योग्य उत्तर दिलें आहे, तें लक्षात ठेवण्यासारखें आहे, तो म्हणाला, "It is not who supposed that working-men, on coming home from labour are to study Euclid and works of that character; and it is not to be desired unless in the case of very special gifts. But what is to be desired is that some effort should be made by men of all classes, and perhaps by none more than the labouring class, to lift ourselves above the level of what is purely frivelous, and to end endeavour to find our amusement in making ourselves acquainted with things of real interest"

१८४५ सालीं मुंबईमध्यें जी 'नेटिव जनरल लायब्ररी' स्थापन झाली. तिच्या पुरस्कर्त्यांनीं या वाङ्मयावर आरंभी बहिष्कारच घातलेला होता या धर्मार्थ पुस्तक संग्रहाच्या १८५३ च्या "रपोर्टा"वर लिहितांना 'ज्ञानोदय'कार आपल्या मार्च १८५६ च्या अंकात लिहितात 'या पुस्तकालयाचें व्यवस्थापक मंडळीच्या सभासदांनी पुस्तकांचा संग्रह करतांना आपला मोठा सुविचार व सुरुचि प्रकट केली आहे. गावाळ ग्रंथ व भाकडकथादि पुस्तकें यांची खोगीरभरती करून त्यानीं हें पुस्तकालय उभारलें नाहीं. ज्यास इंग्रजीमध्यें नॉवेल्स म्हणतात तशा प्रकारचें कल्पित कहाण्याचें तर एकही पुस्तक त्यानीं ठेविलें नाहीं. परंतु ज्यापासून वाचणाऱ्याची जिज्ञासा तृप्त होते, त्याच्या अंगी बहुश्रुतपणा प्राप्त होतो, त्यांचे विचार वाढतात, बुद्धि प्रकाशित होते, नीति सुधारते व सद्भक्ति मिळून मन ईश्वरपरायण होतें, अशी पुस्तकें त्यांनीं जमविलीं" कथावाङ्मयावर एकजात बहिष्कार घालून अशाप्रकारें आपणही दुसऱ्या टोकाला जावें असें आपल्याला माझें सांगणें नाहीं. परंतु ललित वाङ्मय इतर साऱ्या उपयुक्त वाङ्मय प्रकाराना गिळून टाकणार नाहीं, एवढीच आपण काळजी घ्यावी, अशी माझी आपणास विनंति आहे. योग्य प्रमाणांत त्यांचा संग्रह व्हावा. विविध शास्त्रें, निबंध चरित्र, प्रवासवर्णनें, राजकारण, शेतकी, धर्म, व्यापार, उद्योग, इतिहास, इत्यादि विषयावरील ग्रंथासही आपल्या संग्रहालयांत योग्य

स्थान मिळालें पाहिजे कोणत्याही परिस्थितींत ललित वाङ्मयाला म्हणजे काव्य, नाटक, कथा, विनोद या विषयांना अर्ध्यापेक्षां जास्त जागा मिळूं नये असें जर न झालें तर आपल्या पंतप्रधानानीं मोठ्या प्रेमानें, आस्थेनें व उत्साहानें ग्रंथालय चळवळ खेडोपाडीं पोंचविण्याचा जो खटाटोप सुरू केला आहे तो त्याचा अव्यापारेषु व्यापार ठरेल व नव्या सरकारनें दारूचीं दुकानें बंद करून त्यांच्याहीपेक्षां घातक असलेलें हे वाङ्मय मदिरेचे गुत्ते उघडल्यासारखें होईल !

कादंबरी वाङ्मयावर वाचकांची उडी असते हें खरें; पण त्या कादंबऱ्या हरिभाऊ आपट्यांच्या नाहींत. अशा प्रकारच्या अभिजात व सात्त्विक स्वरूपाच्या कादंबऱ्या शांकरभाष्यासारख्या गंभीर वाङ्मयाच्या सदरांत घालण्याचा प्रसंग आला आहे, असें परवांच एका ग्रंथीनें सांगितलें ज्या कादंबऱ्यांत तरुणतरुणींच्या भानगडी आणि लैंगिक गुदगुदल्या करणारे व क्षोभकारक प्रसंग व वर्णनें नाहींत तीं पुस्तकें आज लोकांमध्यें लोकप्रिय होऊं शकत नाहींत वाचनालय चळवळ यशस्वी होण्यास साक्षरता व जिज्ञासा किंवा ज्ञानोत्सुकता यांची तिला जोड मिळाली पाहिजे. निरक्षर समाजांत ग्रंथालय स्थापन करणें आणि थंड पाण्याच्या किटलींत चहाची पावडर टाकणें एकच आहे चहाची पानें कितीही उत्कृष्ट असलीं तरी पाणी उकळल्याशिवाय त्याच्यातील रंग, गंध व चव पाण्याला येणें शक्य नाहीं. त्याप्रमाणें कितीही उत्कृष्ट ग्रंथ असले तरी समाज जर साक्षर व सुशिक्षित नसेल तर त्यांतील ज्ञान लोकांमध्यें संक्रांत होणें अशक्य आहे. "Society is a strong solution of books" असें जें Oliver Wendell Holmes यानें म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. उत्कृष्ट पेय बनावयाला जशीं चहाची जात उंची पाहिजे. त्याप्रमाणें सुसंस्कृत समाज तयार होण्यास त्याच्यामध्यें उत्कृष्ट ग्रंथसंग्रह असला पाहिजे हे ओघानेंच सिद्ध झालें. आपला जिल्हा कृषिप्रधान असल्याचा लौकीक जुनाच आहे गोपाळ बाबाजी जोशी यानीं आपल्या रोजनिशींत (ता. १५ आक्टोबर १८६७) आपल्या लोकांचें मार्मिक वर्णन केलें आहे. ऐशीं वर्षांपूर्वी आपले पूर्वज कसे होते तें आपणास कळावें म्हणून ती नोंद वाचून दाखवितों—

"दक्षिण कोंकण आणि उत्तर कोंकण यांचे दरम्यान मुंबई आहे. मुंबईपलीकडे दक्षिणेस गेलें म्हणजे दक्षिण कोंकणांतील लोकांच्या खुणा दिसूं लागतात. येथील कांहीं लोक ठाणे व मुंबई येथील लोकांप्रमाणें पोशाक करणारे दृष्टीस पडतात. परंतु अलिबाग सुटली म्हणजे पांढरीं पागोटीं व बुधवारी पंचासारखी आखूड वस्त्रें नेसणें हा प्रघात दृष्टीस पडूं लागतो. इकडील लोकांच्या रीतिभाती आणि मुंबईचे उत्तर आगचे लोकांच्या रीतिभाती यात बरीच तफावत आहे इकडील ब्राह्मण लोक स्वतः शेती करणारे आहेत तसे उत्तरेकडील नाहींत. त्याप्रमाणेंच दोघांचे भाषेंतही थोडा फेरफार पडलेला आहे— उदाहरण—

"अष्टागरांत अठवल्याचे घरीं अगस्त्याचे झाडाखालीं हत्ती पाहिला" असें किंचित् लांबट बोलतात, तसा प्रकार उत्तरेकडे नाहीं, त्यामुळें नवख्या माणसास तें बोलणें ऐकून नवल वाटतें. अशी नागांव येथें ब्राम्हणांची एकंदर तीनशें घरें आहेत. ब्राम्हणाच्या मोठ्या समुदायाचा गांव ठाणें जिल्ह्यांत यासारखा दुसरा नाहीं. येथील लोक लिहिण्यावाचण्याचे कामांत इतर ब्राम्हण वस्तीचे मोठे गांवापेक्षां मागें आहेत. सुमारें पंधरा वीस वर्षांपूर्वी डांकेतून कागद आला असतां दुसऱ्याचें घरीं वाचावयास न्यावा लागत असे अशी ब्राम्हणांची घरें होती, असें सांगतात; परंतु जरी या कारकूनीचे कसबात हे लोक मागे आहेत तरी कृषिकर्मांत यांनीं ठाणे जिल्ह्यांतील सर्व गांवच्या ब्राह्मणांपेक्षां आघाडी ठोकिली आहे. आणि यामुळें यांचीं शरीरेंही तशींच चांगलीं मजबूत व भव्य दिसतात. मी येथें सरकारी शाळेंत बसलों असतां एक सभ्य ग्रामस्थ चांगले गवताचें मजबूत ओझें डोकीवर घेऊन जात होते. त्याला शाळेचे हेडमास्तर यांनीं हाक मारून सांगितलें की, "अहो रामभट, हे गृहस्थ ठाण्याहून आपल्या गांवच्या ग्रामस्थांस मुद्दाम भेटण्यास आले आहेत. याजकरितां भीमेश्वराच्या देवळांत सभेस यावें." त्या गृहस्थाचे डोकीवरील ओझें उत्तर कोकणांतील (वसई प्रांतांतील) कोणत्याहीं ब्राह्मणाचे डोक्यावर दिलें तर बहुतकरून जमीन सोडून तो उठणारच नाहीं, इतकें मोठे होते. साराश, हे लोक कृषिकर्मांत पुढें असल्यामुळें त्यांची शरीरसंपत्ति व संततीही तशीच मजबूत व निरोगी आहे. आणि त्याविरुद्ध आमचें वर्तन असल्यामुळें पंडुरोगी व भाद्रपद महिन्यांतील पांगशा पडवळाप्रमाणें उत्तर कोकणांतील प्रजा झालेली आहे."

आतां ज्याचें वर्णन केलें तो रामभट आपल्या समाजांतून लुप्त होणें इष्ट नाहीं. अशा रामभटाला किंवा इतर खेडूताला त्याच्या शेतकी कामाला उपयुक्त अशी पुस्तकें तुम्हीं पुरवाल तर आपल्या वाचनालयाचें अस्तित्व सार्थकीं लागेल. अलीकडेच वृत्तपत्रामध्यें, अलिबाग तालुका भजनी मंडळ अशासारखी आपल्या जिल्ह्यांत एक संस्था आहे. व रा. साने गुरुंच्या अध्यक्षतेखालीं त्यांची एक परिषदही भरणार आहे असें वाचलें. या संस्थेचा उपयोग खेडूतांमध्यें साक्षरता प्रसार करण्याकरितां तुम्हांला करून घेतां येण्यासारखा आहे. श्रमकरी लोकांचा श्रमपरिहार होण्यास नामदेव तुकारामाचा जेवढा उपयोग होईल तेवढा तो फडके खाडेकरांचा होणार नाहीं. आतांच सांगितलेल्या रामभटाच्या हातांत तुम्हीं कादंबरी या म्हणजे डोक्यावर गवताचें ओझें घेणें सोडाच, परंतु टोपी देखील त्याला जड होईल! गवताच्या ओझ्या ऐवजीं इंग्रजी पद्धतीच्या केसाचें ओझें धारण करून गोपाळबाबाजीच्या मघासच्या

शब्दांत सांगावयाचें म्हणजे, "भाद्रपद महिन्यांतील पांगशा पडबळाप्रमाणें" तो पंडुरोगी बनेल ! विल्यम गाडवीन म्हणतो, "When I read Thompson, I become Thompson. when I read Milton I become Milton. I find myself a sort of intellectual cameleon assuring the colour of the substance on which I rest." जनतेमध्यें वाचनाभिरुचि निर्माण होण्यास साक्षरतेप्रमाणें जिज्ञासाबुद्धिही असावी लागते, असें मी सांगितलें. जिज्ञासाबुद्धि ही ज्ञानार्जनाला प्रेरक असते. ज्ञानार्जनाची हौसच नाहीं तर माणूस ग्रंथ हातांत घेईलच कशाला ? असा एक नियम आहे कीं, ज्याला परक्या भाषेचें किंवा तिच्या व्याकरणाचे ज्ञान करून घ्यावयाचें असेल त्याला स्वतःच्या भाषेच्या व्याकरणाचें चांगलें ज्ञान असावें लागतें. तसें स्वतःच्या जन्मभूमीचा इतिहास, सामाजिक परिस्थिति, शेती व व्यापारउद्योग वगैरे गोष्टींची ज्याला माहिती नाहीं त्याच्यापुढें अमेरिका ऑस्ट्रेलिया, जर्मनी, इंग्लंड, चीन, जपान या देशांच्या माहितीचें ग्रंथ आणून ठेवले तर तो त्यांच्याकडे ढुंकूनही पाहाणार नाहीं व त्या माहितीचा आपल्या देशाच्या सुधारणेकरितां त्याला उपयोग करून घेतां येणार नाहीं.

आपल्या कुलाबा जिल्ह्याकडे पाहिलें म्हणजे मला अमेरिका खंडाची आठवण होते. येथील मूळ रहिवासी आग्री, कातकरी, कोळी हे सोडले तर ब्राह्मण, मराठे वगैरे इतर लोक शिवाजी व आग्रे यांची सत्ता येथें दृढमूल झाल्यावर वेळोवेळीं येऊन राहिलेले दिसतात. म्हणजे अलिकडच्या तीनशें वर्षांच्या आंतील ही सगळी नवी वसाहत आहे तरीपण अनेक ऐतिहासिक पुरुषांशी या भूमीचा संबंध आहे. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेक रायगडावर झाला आणि शिवशाहीचा अस्त न होता त्याच्या राजघराण्यांची परंपरा व सत्ता जर अखंड राहाती तर आज संबंध महाराष्ट्राचें आपला जिल्हा हें केंद्र झालें असतें. आज आपली ही वाचनालय परिषद जर रायगडावरच भरवितां आली असती तर छान झालें असते, परंतु प्रत्यक्ष रायगडावर नाहीं तरी जुन्या रायगड तालुक्यांत आजची आपली परिषद भरत आहे, ही अत्यंत समाधानाची व अभिमानाची गोष्ट आहे. ज्या ठिकाणी शिवराज्याचा राजाभिषेक झाला तो भूभाग प्रत्येक महाराष्ट्रीयाला काशी रामेश्वराप्रमाणें पवित्र व वंद्य

वाटला पाहिजे. रायगडावरील राजसत्ता नष्ट झाली तरी तालुक्याचें नांव बदलून रायगडची स्मृतिही नष्ट करणें हा अत्यंत खोडसाळ प्रयत्न आहे. पूर्वी गोरेगांव व महाड यांचा रायगड तालुक्यांत समावेश होत होता. १८६६ सालीं रायगडला महाड असें नांव देण्यांत आलें व जुन्या रायगड तालुक्याचा गोरेगांव हा लचका तोडून व जुन्या राजपुरी तालुक्याचे तळे, निजामपूर हे भाग त्याला जोडून सध्यांचा नवा माणगांव तालुका बनविण्यांत आला. मी तर म्हणतो कीं आपल्या संबंध जिल्ह्यालाच रायगड जिल्हा असें नांव देऊन शिवरायाचें स्मारकच येथें आपण उभें करावें. आपला हा जिल्हा १८६६ पर्यंत ठाणे जिल्ह्याचा उपजिल्हा होता. तेव्हां त्याला कुलाबा असें नांव नव्हतें कलाबे हा मूळ अरबी शब्द असून त्याचा अर्थ मोल्स्वर्थ देतो तो असा— " A neck of land, or a strip running out into the sea as the Colaba of Bombay and of Angria's country." अलिबागजवळ जें या नांवाचें एक बेट आहे त्याला जुन्या अरब व्यापाऱ्यांनीं केव्हांतरीं कुलाबा असें नांव दिलें. तेथील किल्ला प्रसिद्धच आहे. येथें कान्होजी आंग्रे यानें आपलें मुख्य ठाणें केलें आणि या जागेला महत्त्व आलें १८४० सालीं दुसरा कान्होजी अल्पवयांत वारला व आंग्र्यांचा मुलूख खालसा झाला. त्यावेळीं कांहीं वर्षे त्याचा कारभार एजन्ट नेमून चालला. पुढें अलिबाग, पेण, रोहा, माणगांव व महाड या पांच तालुक्यांचा मिळून १८६९ सालीं एक स्वतंत्र जिल्हा करून त्याला कुलाबा असें नांव देण्यांत आलें. आपल्या जिल्ह्यांच्या राजकारभाराचें मुख्य ठिकाण अलिबाग हें आहे वास्तविक ठाणे, रत्नागिरी, कारवार, या इतर जिल्ह्यांप्रमाणें अलिबाग हेंच आपल्या जिल्ह्याला नांव मिळावयास पाहिजे. परंतु जिल्ह्याला किंवा प्रांताला त्याच्या राजकीय केंद्राचें नांव मिळालेंच पाहिजे असे नाहीं. उदाहरणार्थ–मुंबई प्रांताला मुंबई बेटाचें नांव मिळालें, पण बंगाल प्रांताला कलकत्ता असें नांव नाहीं. तेव्हां आपण प्रयत्न करून आपल्या जिल्ह्याला ' जिल्हा रायगड ' असें नांव मिळवावें. म्हणजे हा आपल्या पुढें स्फूर्तीचा अखंड झराच निर्माण होईल. साक्षरता, ग्रंथसंग्रहालयें व संशोधन ही एकाच लोक–शिक्षणाच्या चळवळीची तीन अंगें किंवा पायऱ्या आहेत. आपण जर रायगड हें आपल्या जिल्ह्याला नांव प्राप्त करून दिलें तर एका बाबतींत तरी आपण या चळवळीचें अंतिम ध्येय गांठलें असें होईल.

आपल्या जिल्ह्यांतील परिस्थिति मला प्रत्यक्ष माहित नसल्यामुळें मी आपणास विशेष सूचना करण्याच्या फंदांत पडलों नाहीं. आपण गांवोगांव किंवा प्रत्येक तालुक्यांत जरी वाचनालयें उघडलीं, तरीपण सर्व जिल्ह्याचें मिळून जेथें प्रत्येक नवें व जुनें मराठी पुस्तक संग्रहीत होईल, असें मध्यवर्ति संग्रहालय उघडावें अशी इच्छा मी प्रकट करतों या ठिकाणी केवळ मराठीच नव्हे तर महाराष्ट्राचा इतिहास, भाषा व संस्कृती यांच्या अभ्यासाला व आपल्या जिल्ह्यांतील व्यापार–उद्योग, शेती व कला यांच्या उत्कर्षाला उपयोगी पडणारी इतर भाषांतील पुस्तकेंही अवश्य असावीं. जिल्ह्याबाहेर असलेलें आपले लोक अशाप्रकारच्या एक उत्कृष्ट ग्रंथालय निर्माण करावयाला आपणास हातभार लावतील, अशी मी आशा करतों. शिवराम महादेव परांजपे, वामन मल्हार जोशी, गोविंद चिमणाजी भाटे असें कितीतरी आपलें लोक जिल्ह्याबाहेर जाऊन विविध क्षेत्रांत नांवारूपास आले आहेत. यापुढें आपल्या जिल्ह्यातच राहून नांवलौकिक व धन मिळविण्याची व्यवस्था झाली पाहिजे. याला आपली ग्रंथालय चळवळ मदत करो व शिवरायाचा हा रायगड जिल्हा संबंध महाराष्ट्राला भूषणभूत व आदर्श होवो, अशी ईश्वराजवळ प्रार्थना करून मी माझें भाषण संपवितों.

# कुलाबा जिल्हा साहित्यिकांपुढील कार्य

श्री. दि. वि. काळे; M. A. संपादक सह्याद्री, पुणें

( गोरेगांव येथील ता. ३१ डिसेंबर १९४६ व १ जानेवारी १९४७ रोजीं भरलेल्या साहित्यिक परिषदेचे अध्यक्षीय भाषण )

स्वागताध्यक्ष, कुलाबा साहित्यिक संघाचे अधिकारी आणि आपल्या या जिल्ह्यांत साहित्यसेवेच्या साधनानें अेकंदर जिल्ह्याची सर्वांगीण प्रगति करूं इच्छिणारे वाचनालय संघाचे वगैरे कार्यकर्ते, हितचिंतक आणि साहित्य प्रेमी नागरिक या सर्वांचे औपचारिक आभार मानण्यांत वेळ न घालवितां त्यांनीं दिलेल्या या अमूल्य संधीचा उपयोग मला दिलेल्या अल्पशा वेळांत माझ्या सामर्थ्याप्रमाणें शक्य तों चांगला होण्यासाठीं माझे विचारच मांडण्याचा उपक्रम करितो. आपल्या या संमेलनाचें नेतृत्व मला देतांना आपल्या कार्यकर्त्यांनीं जें मला मार्गदर्शन केलें तें मला फारच उपयोगी पडलें आणि आपल्या या पूर्वीच्या कार्याचा मला परिचय नसल्यानें अर्थातच या मार्गदर्शनाचा मी भरपूर उपयोग करून घेऊन माझ्या भाषणाची रचना, आपले साहित्य संघाचे कार्यकर्ते यांनीं त्या भाषणासंबंधीं ज्या अपेक्षा प्रगट केल्या त्या अपेक्षा जमेला धरूनच, मी केली आहे हे मला सांगितले पाहिजे आपण कार्याला नवीनच सुरवात करीत आहो, आपली घटनाहि याचवेळीं घडविली जात आहे अशावेळीं आपल्या कामांत शक्य झालें तर थोडे बहुत प्रत्यक्ष सहाय्य करावें आणि प्रत्येक ठिकाणीं गेल्यावर जिज्ञासुमनाला जें शिकता येण्यासारखें आहे ते शिकून घेण्याचा आणि आपल्यासारख्या कार्योत्सुक आणि कार्यक्षम मंडळींचा परिचय करून घेण्याचा आपला स्वार्थ साधावा एवढया अगदी साध्या उद्देशानें मी आपल्यामध्यें आलो असल्यामुळें, मजकडून आपण फार मोठया अपेक्षा करूं नयेत येवढेंच मला आपल्याला विनवावयाचे आहे

आपण कुलाबा जिल्ह्यांतील साहित्यिकांची संघटना करतांना कांहीं किमान गुणवत्तेची अपेक्षा केलेली आहे. पण त्यावरून आपल्या संघटनेला होतकरू साहित्यिकांची कांहींच सोय करावयाची नसेल असें मी गृहीत धरीत नाहीं. आणि म्हणून त्या दृष्टीनें कांही विचार मांडण्याचें स्वातंत्र्य घेतों.

साहित्यिक हा प्रामुख्यानें लिहितो. मौलिक सृजनशील ( Creative ) असें वाङ्मय निर्माण करतो, पण त्याच्या त्या वाङ्मयाचें मूल्य ठरविणें, त्याचा प्रसार होणें, जनतेवर, वाचक वर्गावर त्याचा इष्ट परिणाम होणें, अित्यादि गोष्टी आपल्याला आणि साहित्यिक या दृष्टीनें त्यालाहि अभिप्रेत असतात. ' साहित्यासाठीं साहित्य ' असा त्याचा दंडक असेल, तर तो आपल्या सारख्या संघटनेंत कशाला येईल? म्हणून आपल्या एकंदर उद्दिष्टाला पोषक अशी साहित्यिकाची व्यापक व्याख्या आपण गृहीत धरली आहे, आणि साहित्याचीहि व्याप्ति आपल्याला तशीच आणि त्याच धोरणानें वाढवावी लागेल

तेव्हां साहित्यिकाच्या लेखनाची चिकित्सा करण्यापूर्वी त्याच्या लेखनाचे विषय आणि विविध प्रकार यांवर मत प्रदर्शन करण्यापूर्वी, साहित्यिकाच्या साधनें-बद्दल दोन शब्द ध्यानांत घेतलेले बरे, आणि होतकरू साहित्यिकांच्या संबंधांत तर ही गोष्ट अत्यंत महत्वाची आहे

साहित्यिक म्हणजे ललित साहित्यच लिहिणारा असा कित्येकांचा एकांतिक आग्रह असतो आणि शास्त्रीय दृष्टीनें त्याचें विवेचन करूं लागलें तर सामर्थ्यशाली वाङ्मय ( Literature of Power ) म्हणून त्याचें व्यक्तिदर्शनाचें आत्मप्रकटीकरणाचें आत्मिक ( Subjective ) रहस्य हें सर्व प्रकारच्याच म्हणजे ( Literature of Knowledge ) वाङ्मयात देखील प्रभावानें चमकतें, याचा सहज देखील साक्षात्कार होतो कै. राजवाड्यांनीं पानिपतच्या पराभवाची मीमांसा करतां करतां जें प्रभावी व सहजस्फूर्त काव्य निर्माण झालें तें त्या दृष्टीनें एखाद्या वैतिक काव्याइतकेच विलक्षण परिणामकारक व हृदयाची पकड घेणारें आहे हें अनेकांच्या प्रत्ययास येण्यासारखें आहे. परंतु असा खोल विचार न करता ललितांतील या सृजनश्रेष्ठत्वाची दखल कोणीच घेत नाहीं. आणि ललित वाङ्मयाचे कथा–लघुनिबंधहि बाह्य स्वरूपावर भर देण्यांतच इतिकर्तव्यता मानली जाते अशा प्रकारांत पडणारें अत्युत्तम वाङ्मय निर्माण करणाऱ्याची नक्कल करण्यानें स्वतः लेखकांचे व वाचकांचें कोणतेंच उद्दिष्ट साध्य होण्यासारखें नाहीं. कोणत्याहि प्रकारचें वाङ्मय हें व्यासंगानेंच श्रेष्ठत्व पावत असतें. बंग कवि रवीन्द्रनाथ ठाकूर ( ऋग्वेद ), कवि–कुलगुरु कालिदास ( ग्रहण ), राजकवि रॉबर्ट ब्रिजेस्, माधव जूलियन आणि आपले विनोदी नाटककार श्री. माधवराव जोशी यांच्या व्यासंगाबद्दल प्रतिभेचे रामशास्त्र्यांनीं आणि इतरांनी प्रसंगोपात्त दिलेली ग्वाही विसरून कधींहि कोणा होतकरू साहित्यिकांचें हित होण्यासारखें नाहीं. अर्थात् प्रत्येक साहित्यिकानें आपल्या साहित्य सेवेची उभारणी व्यासंगाच्या भक्कम पायावरच केली पाहिजे. लेखन हें माध्यम किंवा साधन अंगीकारून मातृभाषेची कांही सेवा करणें हे कोणाहि साहित्यिकाला शोभेल, पचेल व रुचेल असेंच उद्दिष्ट आहे आणि तें कोणत्याहि दृष्टीनें कमीपणाचें नाहीं.

या दृष्टीनें कुलाबा जिल्ह्यातील साहित्यिक आपल्या जवळील साधनांची काळजी-पूर्वक तपासणी करूं लागतील तर त्यांना कितीतरी गोष्टी स्वतःच समजूं लागतील आणि अपेक्षित मार्गदर्शन मिळेल. व्यक्तिमात्राच्या साधन संपत्तीमधील स्वतःचा कल आणि पात्रता ह्या दोन पायाभूत गोष्टी होत इतराच्यापेक्षा आपल्या स्वतःच्याच निरीक्षणानें त्यांबद्दल निश्चय प्रथम केला पाहिजे एकदा आपला कल दिसून आल्यानंतर त्याच्याशीं अव्यभिचारी राहून आपली त्या संबंधीची पात्रता वाढवि-ण्यासाठीं वाचन-मनन- चर्चा-अनुकरण-अभ्यास- लेखन अशा प्रकारानीं व्यासंग सतत-करीत रहाणें ही त्यानंतरची क्रमप्राप्त अशी पायरी होय. सार्वजनिक ग्रंथालयाचा उपयोग कांहीसा होतो नाही असें नाहीं. परंतु उत्पादक व्यासंगाच्या यशासाठीं निवडक ग्रंथ संग्रह स्वतःचाच असणें हें अनुभवानें उपकारक ठरलेलें आहे.

व्यासंगाने योग्य दृष्टि प्राप्त झाल्याची खात्री पटल्यानंतर आपल्या वाङ्मय सेवेचे विषय हुडकण्यासाठीं मनुष्य साहजिकच आवतीभोवती निरीक्षण करूं लागतो. आणि या निरीक्षणाच्या कक्षेंत, साहजिकपणें आपल्या जिल्ह्यांतील निसर्ग, जनता, समाज, समाजसंस्था, धर्म, उत्सव, पवित्रस्थानें, जत्रा, करमणुकी व आनंद विनोदाचे प्रसंग-थोडक्यात बोलावयाचें म्हणजे एकंदर जीवन -विस्तृत व्यापक, अखंड असें जीवन-येतें. आपण मनुष्यजीवनाव्यतिरिक्त इतर जीवनाशीं समरस होऊं शकलों तर आपल्या जीवनविषयक किंवा साहित्य विषयक अनुभवाची कक्षा वाटेल तेवढी अमर्याद होऊं शकते. आणि आपला कल आणि पात्रता जितक्या प्रमाणांत त्या व्यापक जीवनांतील व्यापक सत्य सार्वत्रिक आवाहनपूर्वक वाङ्मय-माध्यमाचें सहाय्यानें प्रतीत करूं शकेल, तितक्या प्रमाणात आपलें वाङ्मय श्रेष्ठश्रेणींत जमा होईल. परंतु या व्यापक आवाहनाचा अट्टाहास धरून केवळ परिश्रमाची कास धरणारा असेल त्यास हसें झाल्याशिवाय राहणार नाहीं

कुलाबा जिल्ह्यात समुद्र आहे कुलाबा जिल्ह्यांत पहाड-डोंगर आहेत. कुलाबा जिल्ह्यांत काहीं सपाट साधा भागहि आहे. आणि त्या सर्व भागांत काहीं विशिष्ट मानव समाजहि आहे त्या त्या मानव समाजाच्या जीवनांत, भाषेंत त्या त्या भूविभागाचें आणि भूभागावरील मानवाचे काहीं गोष्टींचें प्रतिबिंब पडलेलें असेल त्या प्रतिबिंबाचा साक्षात्कार आपल्याला झाला असेल तर अवश्य आपल्या लेखनांत त्याचा परिणाम दिसेल परंतु त्याचा साक्षात्कार काडोभरही झाला नसतांना तसा तो झाल्याचा देखावा करणें हें जीवत साहित्य मानतां येणार नाहीं. वाङ्मय ज्या त्या जीवनाचें प्रतिनिधिक होण्याला लेखकाला जो जिव्हाळा असावयास पाहिजे तो त्या त्या वर्गाच्या प्रतिनिधिंतच असूं शकेल तसा तो अन्य माणसांत नसतोच परंतु त्यांचें प्रदर्शन करण्यासाठीं

त्या त्या समाजाची भाषा व्याकरणदृष्ट्या नीट समजून किंवा कांहीं चुका करूनही वापरण्याचा आग्रह धरणें हा कृत्रिमतेचा कळस आहे आणि या कृत्रिमतेनें आपण वाङ्मयाचें मूळ उद्दिष्ट जें शक्य तो व्यापक आवाहन, त्याच्याच मुळावर घाव घालतो असें होत नाहीं काय? त्या त्या प्रश्नांतील सार काढून अखिल मानव्याला आत्मीयता वाटेल अशा प्रकारें जगापुढे मांडणें ही जर उत्तम साहित्याची कसोटी असेल तर भाषेच्या संकुचितपणामुळे आणि प्रश्नांच्या एकदेशीयपणामुळें आपण त्याचें आवाहन मर्यादित करतों ही गोष्ट, मला वाटतें स्पष्टच आहे.

समाजांतील सर्व दर्जांच्या, विशेषतः दलितादि वर्गांच्या समस्यांकडे दुर्लक्ष करून आपली जगाविषयीची सहानुभूति संकुचित होऊं देऊं नये अशी उत्कृष्ट वाङ्मयाची कसोटी पुढें ठेवतां ठेवतां आपण आपल्या जीवन विषयक दृष्टिकोणाचा आग्रह सोडून त्यांतील सर्वांत कमी महत्वाच्या भाषादि बाह्यांगावर चमत्कारीक तऱ्हेनें भर द्यावा हें वदतोव्याघाताचें एक उत्तम उदाहरण म्हणून सांगतां येण्यासारखें आहे. आपल्या दलित समाजांच्या उन्नतीकरितां जे नानाविध मार्ग आगामी लोकशाहीच्या यशासाठी अवलंबावे लागतील, त्यामध्यें लोकशिक्षणादि मार्गांचें महत्व प्रत्यक्ष अनुभवानें मान्य झालेलें आहे. समाजरचना आणि प्रगतीच्या मार्गावर असलेल्या किंवा बळेंच आणून ठेवलेल्या तथाकथित दलित वर्गीयांच्या आकांक्षांचा अभ्यास केला तर त्यांचा कल उच्च वर्गीयाशीं अधिकाअधिक निकट येण्याकडेच असलेला दिसून येतो. प्रगतिपर, पुरोगामी, क्रान्तीकारक, असे जें कांही असावयाचें किंवा असावयास पाहिजे तें सर्वांचें सारखेंच असण्याकडे प्रवृत्ती असणें हें आजच्या यंत्रयुगाचें, दळणवळणाचीं साधनें वाढलेल्या-हळूहळू मोठमोठे भूभाग एकरूप होण्याच्या मार्गावर असलेल्या जगाचें वैशिष्टय आहे. अशावेळीं मागासलेल्या किंवा केवळ बाह्य संपर्काच्या अभावी कांहीं विशिष्ट वळणांत अल्पकाल स्थिरावलेल्या देशीक भाषांचे वाङ्मयांत दृष्टीकरण केल्यानें आपण पुरोगामी ठरण्याचा संभव आहे का प्रतिगामी ठरण्याचा संभव आहे याचा विचार अवश्य झाला पाहिजे

परंतु हा विचार सोडला तरी सागर, पहाड किंवा इतर कांहीं निसर्गविशेष कुलाबा जिल्ह्याप्रमाणेंच इतरही भूप्रदेशांना सामान्य असणारच, आहेतहि, तेव्हां मुद्दाम होऊन या विशेषाबद्दलच्या साहित्याची विशेष जपणूक करून कुलाबा जिल्ह्यानेंच आपली व्यापकता संकुचित करावी असा आग्रह धरण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. त्यांनीं या सर्व वातावरणांत वागून, जिल्ह्याच्या तांबड्या मातींत लोळून, जो कस पैदा केला असेल तो आपल्या वाङ्मयांत अवश्य अवतरूं द्यावा व अखिल महाराष्ट्रीय

अखिल भारतीय आणि प्रतिभेची तेवढी झेप असेल तर जागतिक साहित्यामध्येंही मानाचें स्थान मंडित करण्याची महत्वाकांक्षा धरावी. ही महत्वाकांक्षा उत्स्फूर्त होण्यासाठीं सुद्धां महाराष्ट्रीय, भारतीय व जागतिक वाङ्मय रत्नांचा परिचय व व्यासंग अवश्य राखला पाहिजे. या व्यासंगाच्या बळावरच आली तर आपला जिल्हा व आपल्या जिल्ह्यांतील वातावरण याला कौतुकाचें स्थान प्राप्त करून देण्याची आपल्याला पात्रता येईल. वाङमय मोठें कशानें होतें हें ध्यानांत न घेतल्यानें हार्डीसारख्या यशस्वी लेखकाच्या एखाद्या विशेष लकबीचें स्तोम अवास्तव माजविण्याकडे सर्व सामान्य वाचकाचा कल होतो असें मला वाटतें. हार्डी हा अन्य दृष्टीने श्रेष्ठ लेखक असल्यामुळें त्याने निर्माण केलेलें वेसेक्स वातावरण वाचकांच्या नजरेंत भरलें. केवळ त्या वातावरणामुळें हार्डी हा मोठा लेखक आहे किंवा झाला असें म्हणतां येणार नाहीं, हें कोणालाहि पटेल.

तात्पर्य, जनता साहित्याचे कोणते प्रकार कुलाबा जिल्ह्यानें हाताळावें हा प्रश्नच तसा सयुक्तिक किंवा प्रामुख्यानें विचारांत घेण्यासारखा नाहीं असे माझें मत झालें असल्यामुळे, सागर साहित्य, पहाडी साहित्य वगैरें प्रकारांना कोणतें स्थान द्यावें हाही मुद्दा विचारांत घेण्यानें कांहीं साधेल असें मला वाटत नाहीं. वाङमय ही वैयक्तिक निर्मितीची बाब आहे, याचा अर्थ मागणीप्रमाणें पुरवठा करण्याची ती बाब नव्हे. आत्मप्रकटीकरण कोणत्या विशिष्ट वातावरणाने उठाव घेईल तें ज्याच्या त्याच्या पूर्व संचितावर अवलंबून ठेवल्याशिवाय गत्यंतर नाही. ती कांहीं भौतिक संपत्तीसारखी विभागनीय किंवा कारखान्यांतील उत्पन्नासारखी 'पीस-वर्क' म्हणून करवून घेण्यासारखी बाब नाहीं आपल्या देशाच्या भवितव्याच्या, सर्वांना अभिप्रेत असलेल्या उज्वल व दिव्य भवितव्याच्या, घडणीची भट्टी या उगाच भासणाऱ्या वैगुण्यामुळें बिघडण्याची भीति कोणी वाटून घेण्याचे मुळींच कारण नाहीं.

जनता साहित्य ह्या शब्दाचा जन्म व त्याचा पुरस्कार यांच्या इतिहासांत फारसें न शिरता वर सांगितल्याप्रमाणें सर्व साधारण जनतेची शिक्षणादि मार्गांनीं जी प्रगति व्हावी असें आपण इच्छितों, त्या प्रगतीला देखील पोषक अशा दृष्टीनें आणि आपण त्याज्य ठरविलेली कृत्रिमता सोडून देऊन उत्तम वाङमयासंबंधी कांही विचार त्या विचाराला धरून मांडतां येणार नाहींत असें नाहीं. परंतु हे विचार जनता-वाङ्मय या एखाद्या विशिष्ट प्रकारालाच लागू नसून सर्वच उत्तम वाङ्मयाला लागू आहेत आणि त्यांच्यावर भर देण्यालाच केवळ उपयुक्त म्हणून त्या सर्व कल्पनांचा एक गट नजरेसमोर उभा करण्याला अनुकूल म्हणून तो शब्द वापरण्यासहि फारशी हरकत मला घ्यावयाची नाही सर्वच वाङ्मय हें जनतेसाठीं-सामान्य जनतेसाठी-आहे. त्यामुळें मिळणारा उच्च आनंद हा सर्व सामान्य जनतेच्या जीवनांत सहज मिळावा म्हणून वाङ्मय त्यांना सहजसुलभ असावें, त्यात प्रसाद हा गुण भरपूर असावा, तें सोपें, सवंग असावें, तें दलित जनांच्या खेड्यां-तील जीवनासंबंधी असावें, याचा अर्थ सर्वांच्या परिचयाच्या जीवनांतून त्याला जीवनरस

परंतु आपलें राजकीयच केवळ नव्हे तर सामाजिक आणि वाङ्मयीन जीवनहि विस्तृत आणि व्यापक होत आहे. वाङ्मयीन आणि साहित्यिक संकेत आणि मूल्यें आतां घुसळून निघणार आहेत जुनें ठेवणें मध्यंतरीच्या कृष्ण युगांत आणि परकी सत्तेच्या आणि भाषेच्या दडपणाखालीं गुदमरून गेलेलें आहे त्या आपल्या जुन्या ज्ञानेश्वरी–दासबोधादि वैभवदर्शी वाङ्मयाचा पुनरुद्धार करून वा जरूर तेथें नव्या जुन्याची सांगड घालून तें वैभव फिरून आपल्या मातृभूमीला आणून देण्याचें काम आपल्या साहित्यिकांचें आहे. कुलाबा जिल्ह्यांतील साहित्यिक ही आपल्यावरील जबाबदारी आपल्या परीने उचलण्यास कटिबद्ध होत आहेत. हा आजच्या प्रसंगाचा मी धडा समजतों. वाचनालयाच्या हातांत हात घालून साहित्यिक आपला प्रपंच थाटीत आहेत ही अत्यंत सर्वप्रकारें उचित अशीच गोष्ट आहे. वाचनालय संघ ही सिद्ध साहित्याची चावडी आहे. तर साहित्यसंघ हा वाङ्मय निर्मितीची पाकशाला आणि सिद्धान्नाची चवकशी आहे. आपल्या जिल्ह्याने या बाबतींत आघाडी मारली आहे. हें आपल्यास भूषणास्पद आहे. या प्रसंगानें आपल्याला मित्रत्वाचा इशारा देणें हें मी आपलें कर्तव्य समजतों आपल्या जाति विशिष्ट समाजांत आधीच जाती कमी आहेत की काय अशा समजुतीनें कोणत्याहि कारणानें कां होईना ? आणखी आणखी गट पाडण्याकडे प्रवृत्ती असल्याचें दिसून येतें आपला साहित्य संघ हा जिल्ह्यांत कांहीं विधायक कार्य करण्यासाठीं अवतरला आहे हें कोणालाहि चटकन समजण्यासारखें आहे आणि हें कार्य आपल्याला सर्व समाजापासून अलग न वागतांच साध्य केलें पाहिजे. किंबहुना कुलाबा जिल्ह्याचें सांस्कृतिक जीवन आबाल वृद्धांचें, सर्व वर्गांचें जीवन समृद्ध करणें हाच आपला एकमेव आणि सर्वसामान्य उद्देश असूं शकेल–असावा परंतु यामध्यें संकुचितत्वाचा केव्हां शिरकाव होईल आणि आपली अशी निराळी जाती वेगळी पडेल याची मला भिती वाटते म्हणून नवे–जुने, सनातनी–नवमतवादी, आंग्ल विद्याभूषित–मराठी शिक्षित असे भेदभाव प्रयत्नपूर्वक टाळून एकप्रकारच्या सर्वांगीण सामुदायिक जीवनाचा पाया या आपल्या संघामुळें घातला जाईल, यासाठीं जपा. या दृष्टीनें साहित्यिकाची ही व्यापक व्याख्या मनांत बाळगून शक्य त्याप्रकारें साहित्योपजीवि म्हणजेच पर्यायानें साहित्यप्रेमी सर्व जनतेचें पाठबळ मिळवून घ्या. जिल्ह्याच्या सार्वजनिक जीवनांत अशा एखाद्या संस्थेचा अवतार झाला तर आणखी अनेक संस्थांचें फारसें कारण पडूं नये. सर्व वाङ्मयकारणाचें तरी एकीकरण व्हावें कीर्तन–पुराणकारांना देखील साहित्यजीवी म्हणून आपल्या संघाचें सदस्यत्व मोकळें ठेवणें हें आपल्याला जड वाटूं नये, एवढेच मला शेवटी सांगावयाचे आहे.

★

आम्हांस आज हवीं असलेली

# आदर्श ग्रंथालयें

कृ. के. राहाळकर, कार्याध्यक्ष,
सार्वजनिक वाचनालय व जिल्हा ग्रंथालय, अलिबाग.

आपल्या प्रिय भारतानें स्वातंत्र्यांत पदार्पण केलें आहे. भारताच्या असंख्य देशभक्तांनी सोसलेल्या त्रासांचे, भोगलेल्या हालांचे, केलेल्या स्वार्थत्यागाचें आणि अंतःकरणाशी बाळगलेल्या आशाआकांक्षांचे पर्यवसान संपूर्ण सार्वभौम लोकसत्ताक राज्य स्थापण्यांत झालें. जगाच्या पाठीवर स्वतंत्र भारताचे प्रतिनिधी सन्मानानें जाऊं लागले, संयुक्त राष्ट्रसघांत भारताचा राष्ट्रध्वज मानानें फडकूं लागला. भारत हा एक जगाचे मानाचे स्थान व आशास्थान होऊन बसला. याबरोबरच स्वतंत्र राष्ट्र म्हणून सन्मानानें मिरविण्याची पात्रता प्राप्त करून घेण्याची जबाबदारी पण भारतावर येऊन पडली ! ती जबाबदारी पार पाडण्याचें काम भारत सरकार व प्रांतिक सरकारें यांना करावयाचे आहे. तसे प्रयत्न होत आहेतच.

स्वतंत्र देशाला आपलें रक्षण करण्यासाठीं, आपला देश सुखी व संपन्न करण्यासाठीं, लष्कर, आरमार, विमानदल, कारखाने, धरणें, वीज – पुरवठा, व्यापार वगैरे गोष्टींकडे लक्ष पुरवावे लागते पण त्याबरोबरच आपल्या राष्ट्रांतील लोकांना आदर्श नागरीक बनविण्यासाठीही प्रयत्न करावे लागतात. राष्ट्रातले लोक जर आदर्श नागरीक नसतील, नागरीकांची कर्तव्य योग्य प्रकारें पार पाडण्याची पात्रता त्यांना नसेल वा त्याना आपल्या कर्तव्याची जाणीव व समजच नसेल तर त्या देशाच्या स्वातंत्र्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. म्हणून नागरिकाना कर्तव्यरत बनविण्यासाठीं, त्यांना सुसंस्कृत बनविण्यासाठीं प्रयत्न करणें अवश्य आहे स्वतंत्र देशाच्या राजकर्त्यांचे तें एक आद्य आणि आवश्यक कर्तव्य असतें नागरिकाना सुसंस्कृत आणि सुशिक्षित करावयाचे म्हणजे त्यांना योग्य प्रकारचें शिक्षण दिले पाहिजे, नुसतें शिक्षण देऊनच भागणार नाहीं, तर तें टिकविलें पाहिजे व शक्य तर वाढवीतही राहिले पाहिजे या कार्यासाठीं अनेक साधनांची सोय सरकारला करावी लागते मुंबईराज्यानें सरकार या दृष्टीनें अनेक प्रयत्न करीत आहे वाचनालय प्रसार योजना हा त्यापैकीं एक महत्त्वाचा प्रयत्न आहे.

## वाचनालयाचे स्थान

ज्ञानाची महती भगवान श्रीकृष्णानीं आपल्या जगमान्य भगवद्गीतेंत गाईली आहे. 'नहिज्ञानेन सदृशं: पवित्रमिह विद्यते' (ज्ञानासम नसे कांहीं, पवित्र दुसरें जगीं) अशा प्रकारचें ज्ञान लोकांना देणे व टिकविणें ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. आजच्या काळांत असे शिक्षण देण्याची सुंदर प्रभावी साधनें, विद्यालय, वृत्तपत्र व वाचनालय (ग्रंथालय) हीं मानली जातात. या सर्व साधनांचा एकदम उपयोग करतां येण्यानें फार मोठेंच कार्य होईल पण एक एक साधनसुद्धां कांहीं कमी महत्त्वाचें ठरणार नाहीं आपल्या देशाला आजच्या काळांत वरील पैकीं कोठलें साधन विशेष उपयुक्त ठरेल याचा विचार केला पाहिजे. इंग्रजी राज्यांत सुरवातीलाच शिक्षण प्रसारासाठीं विद्यापीठें स्थापन झाली. त्यावेळीं "आतां ज्ञानाचे झिरपे खाली साऱ्या मैदानांत लागतील, म्हणून उच्च शिक्षणाचे हे विद्यापीठरूपी तलाव आम्ही उच्च ठिकाणीं बांधीत आहोत" असे त्यावेळच्या राज्यकर्त्यांनीं म्हटलें होते. आज इतकीं वर्षें झाली, पण ज्ञानप्रसाराचें कार्य कितीसें झालें? जास्तींतजास्त शेंकडा २० टक्यांच्यावर सुशिक्षितता जाऊं शकली नाहीं! जनता सुशिक्षित नसेल तर वृत्तपत्रांचा तरी काय उपयोग होणार? "बाहेरील जगांतील अफाट ज्ञानाचे जीवंत झरे आणि झिरपे" जनतेच्या खालच्या थरापर्यंत नेण्यास खरी-खुरी मदत आजच्या काळांत ग्रंथालयें आणि वाचनालयें यांचीच होणार आहे.

## आजची गरज, साक्षरता

आज आपल्या देशाला अगदीं पहिली गरज कसली असेल तर ती साक्षरता प्रसाराची आहे त्या योगेंच भारतांत खरीखुरी लोकशाही स्थापन होणें शक्य व सुलभ होईल. या गोष्टीकडे आपल्या स्वतंत्र सरकारनें लक्ष पुरवलें आहे व त्या दृष्टीनें प्रयत्नांची पराकाष्ठा चालविली आहे. विद्यापीठें स्थापन करणें, प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करणें, याबरोबरच ग्रंथालयें व वाचनालयें काढणें व चालविणें या गोष्टीलाही प्राधान्य देण्यांत आलें आहे. मुंबई राज्याचे माननीय पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर यांनीं या कार्यांत जातीनें लक्ष घातले आहे. त्यांचें अनुकरण इतर प्रांतांतही होत चालले आहे, ही शुभदायक अशी गोष्ट आहे. साक्षरता प्रसारास ग्रंथालयांची फार मोलाची मदत होणार आहे. याच अर्थानें जगप्रसिद्ध तत्ववेत्ता कार्लाईल यानें "A true University in these days is a collection of Books (Library)" असें म्हटलें आहे. ज्ञानप्रसाराच्या दृष्टीनें विद्यापीठापेक्षां कदाचित् वाचनालयांनाच (ग्रंथालयांना) जास्त महत्व द्यावे लागेल.

## आदर्श ग्रंथालय

पाश्चात्य देशांत ग्रंथालयांना फार महत्त्व प्राप्त झाले आहे. तेथें सर्वसामान्य जनतेंत शिक्षणाचा फैलाव करण्याचें प्रभावी साधन म्हणून वाचनालयांची गणना केली जाते. अक्षर ओळख होऊन साक्षरतेच्या प्रांगणांत पाऊल टाकल्यानंतर साक्षरतेच्या विकास कायम स्वरूपाचा होण्यासाठीं सार्वजनिक ग्रंथालयासारखें दुसरें उपयुक्त साधन नाहीं हें ओळखून पाश्चात्य राष्ट्रांनीं ग्रंथालयें नीट चालविण्यासाठीं एक नवीनच ग्रंथालय शास्त्रही निर्माण केलें ! स्वतंत्र भारतालाही साऱ्या जनतेला साक्षर करून, शहाणे करून सोडावयाचें असेल तर ग्रंथालयांची मदत घ्यावयास पाहिजे व यासाठीं जागोजाग आदर्श ग्रंथालयें निर्माण केलीं पाहिजेत. अशीं आदर्श ग्रंथालयें कशी असावीत? ग्रंथालयांना करावयाचीं कार्यें नीट तऱ्हेनें ज्या ग्रंथालयांत साध्य होतील ती आदर्श ग्रंथालयें होत, असें म्हणावयास हरकत नाहीं

ग्रंथालयांना तीन प्रकारची कार्यें करावी लागतात (१) निरक्षर जनतेला साक्षर बनविणें व तिला आपल्या कर्तव्याची जाणीव उत्पन्न करून देणें. (२) साक्षर जनतेला सुशिक्षित बनवून योग्य विचार व तदनुसार आचार करावयास शिकविणें आणि (३) सुशिक्षित जनतेला अधिक विचारवंत, अधिक सुशिक्षित व सुसंस्कृत व अधिक कार्यक्षम बनविणें. हीं कार्यें ज्या ग्रंथालयाकडून योग्य प्रकारें पार पाडलीं जातील ते ग्रंथालय आदर्श ग्रंथालय म्हणतां येईल आशिया कविसम्राट कै. गुरुदेव टागोर यांच्या विश्वभारती विद्यापीठांत निरनिराळ्या प्रकारची ग्रंथालयें आहेत. या बाबतचे त्यांचे विचार उद्धृत करण्याजोगे आहेत. त्यांनीं म्हटले आहे,—
"That Library alone can be called hospitable which shows an eagerness to invite readers to the feast at its disposal. It is such hospitality that makes the Library big, not its size. That the readers make the Library is not the whole truth; The Library like wise makes the readers."

## आमच्या गरजा भागविणारीं ग्रंथालयें हवीं

आदर्श ग्रंथालय कसें असावे याचा विचार करतांना युरोपांतील ग्रंथालयें डोळ्यासमोर उभे राहतील इंग्लंड, अमेरीका, जर्मनी, फ्रान्स, रशिया वगैरे देशांतील ग्रंथालयांतील ग्रंथसंग्रह, इमारती, फर्निचर, व इतर सुखसोयी विचारांत घेतां तशी ग्रंथालयें म्हणजेच आदर्श असें म्हणण्याचा मोह उत्पन्न होईल. पण मला मात्र

तसें वाटत नाहीं आपल्या इकडील ग्रंथालयांना तशी अवस्था प्राप्त व्हावयास अद्याप पुष्कळ वेळ जावा लागेल. आम्हांला आदर्श ग्रंथालयें तीच म्हणतां येतील कीं जी आम्हांस आमच्या गरजा भागविण्यास उपयुक्त ठरतील. वर उल्लेख केलेलीं कार्ये आज आपल्या येथील ग्रथालयाना करावयाची आहेत. तीं योग्यप्रकारें करणारें ग्रंथालयच आपलें आदर्श ग्रंथालय ठरेल तीं कार्यें यशस्वी होण्यासाठीं नुसतीं ग्रंथालयें स्थापन करून भागणार नाहीं. त्यांतील पुस्तकें व नियतकालिकांची निवड योग्यप्रकारें झाली पाहीजे, ती योग्य-प्रकारें ठेवली पाहिजेत त्यासाठी योग्य ग्रथपाल पाहिजे, योग्य जागा व इमारत पाहिजे आपल्या ग्रथालयांना साधारणपणें खेड्यांतील जनतेला उपयुक्त असे कार्य करावें लागणार आहे, ही गोष्टही नजरेआड करून चालणार नाही

## साधनें

समाजाची सास्कृतिक कक्षा उन्नत करणें हे सार्वजनिक वाचनालयांचे अंतिम ध्येय होय. हें ध्येय वा साध्य साधावयाचे यासाठीं वाचनालयाची वा ग्रंथाल-यांची मुख्य साधनें चांगली व योग्य अशी असली पाहीजेत. ही साधनें (१) ग्रंथांचा संग्रह व नियतकालिकें (२) फर्निचर (कपाटें, खुर्च्या टेबलें वगैरे) व जागा (३) ग्रंथपाल (४) वाचक (५) पैसा—पंच या साधनाच्या सहाय्यानेंच ग्रंथालय आदर्श ठरणारे आहे.

## ग्रंथ व नियतकालिकें

पहिलें मुख्य व महत्त्वाचें साधन म्हणजे पुस्तके व नियत कालिकें. यांची निवड करतांना योग्य काळजी घेतली पाहिजे. साहित्य—सम्राट कै. तात्या-साहेब केळकर यानीं ग्रंथांना 'ज्ञानाचीं सदावर्ते' म्हटलें आहे. वाचनालयाना ज्ञानप्रसारा-बरोबर मनोरंजनाचें कार्यही करावयास पाहिज त्या दृष्टीनें निवडक कादंबऱ्या, लघुकथा, नाटकें वगैरे ललित वाङ्मय त्यात असले पाहिजे. ज्या भागांत ग्रंथालय असेल त्या मानानें निरनिराळया विषयांवरील निवडक पुस्तकें त्यात असली पाहिजेत. आपला देश शेती—प्रधान असल्यामुळें त्या विषयावरील पुस्तकें असली पाहिजेत एकादा गांव वा शहर समुद्राजवळ असल्यास सागरीक जीवनाशी संबंध असणारें वाङ्मय त्यांत असावे. ऐतिहासिक, भौगोलीक विषयावरची निवडक पुस्तकें त्यात असली पाहीजेत. चरित्रें, काव्य, हे विषय यथायोग्य प्रमाणात असावे. ग्रंथालयाचा उपयोग आबाल—वृद्ध - स्त्री पुरुषाना घेतां येईल अशी पुस्तकें ग्रंथालयात असावी. आजच्या काळात हिंदीच्या परीक्षा, साहित्य परिषदेच्या परीक्षा, विश्वविद्यालयीन परीक्षा यांना उपयुक्त अशी पुस्तकें ठेवणेंही उपयुक्त ठरेल. नियतकालिकाची निवड करतांना बातम्या मिळविण्याच्या कार्याबरोबरच, साक्षर प्रौढ विद्यार्थी, भगिनी वर्ग यांना उपयुक्त अशी वृत्तपत्रें व मासिकें घ्यावीत. ही सोय झाल्यावर उच्च दर्जाची अशी पुस्तकें व नियतकालिकें घ्यावीत. अर्थात् हें सर्व करतांना द्रव्याचें प्रमाण पाहून त्या प्रमाणात सर्व करावे लागेल.

नुसतीं पुस्तकें वाचून कार्य होणार नाहीं. त्यासाठी निरनिराळ्या पुस्तकांवर व विषयांवर भाषणें, चर्चा घडवून आणल्या पाहिजेत. निरनिराळ्या विषयांवर तज्ञांची व्याख्यानें करविली पाहिजेत. ग्रंथालयांतील पुस्तकें वाचण्यासाठीं लोकांची मनें तयार झाली पाहिजेत ही गोष्ट लक्षांत घेऊन वरील कार्यक्रम आंखले गेले पाहिजेत.

## फर्निचर व इमारत

माझ्या मतें वरील मुख्य साधन चांगलें असल्यावर फर्निचर बेताबेताचें असले तरी चालेल. ग्रंथ संग्रह नीट ठेवतां येणें, पुस्तकें झटकन वाचवयास मिळणें, व नीट तऱ्हेनें बसून वाचण्याची सोय होणे या दृष्टिनेंच फर्निचरची व्यवस्था करावी ग्रंथालयाला उत्कृष्ट अशी इमारत असली पाहिजे. शांत आणि रम्य वातावरणांत होणारे वाचन मनावर चांगला परिणाम करण्यास मदत करते. अशा प्रकारची इमारत शक्य तो वाचनालयासाठीं निवडणें हा एक महत्त्वाचा भाग आहे अर्थांत ग्रंथालयाचे चालक वर्ग या साठीं शक्य तो प्रयत्न करतातच. वाचकांनीही थोडीफार जास्त वर्गणी द्यावी लागली तरी द्यावी. व चांगली जागा मिळेल अशी संधी द्यावी. मुंबई प्रांतापुरते सांगावयाचे झाले तर सरकारी मदतीच्या साहाय्याने अशी जागा मिळविणें ग्रंथालयांना यापुढें शक्य होणार आहे.

## ग्रंथपाल

येणाऱ्या वाचकांस योग्य मार्गदर्शन करील व ग्रंथाची व्यवस्था नीट ठेवील असा ग्रंथपाल असावयास पाहिजे. तें काम नीट होत असेल तर पुस्तकांचा कॅटलॉग कोणत्या पद्धतीनें असावा, वर्गीकरण कोणत्या तऱ्हेनें असावें या गोष्टीला अवास्तव महत्त्व देण्याचें कारण राहाणार नाहीं. वाचकाला सुलभपणें आपली वाचनाची तहान भागवितां येणें यासाठीं या सर्व गोष्टी आहेत. पुस्तकांचे वर्गणीकरण करण्याची पद्धती आपल्या इकडे सर्वमान्य होणारी असेल तीच अंमलांत आणल्यास सोईचे होईल. पुस्तकांचे, विषयवार आणि लेखकवार अशा दोन पद्धतीचे कॅटलॉग ( सूची ) असल्यास पुस्तकें शोधण्यास सुलभ होईल. मुक्तद्वार ग्रंथालयांना अशा सूचींची फारशी गरज लागणार नाही. पण फार मोठ्या अशा ग्रंथालयांनीं प्रचलीत पद्धतीच्या निरनिराळ्या सूची अवश्य तयार ठेवाव्यात.

## वाचक

ग्रंथालयाचा वाचक हा एक महत्त्वाचा घटक आहे. आपणांस काय वाचावयास हवे आहे याची त्यास जाणीव असते. त्याप्रमाणें वाचणें हें त्याचें काम आहे. ग्रंथपालाच्या मदतीनें व मार्गदर्शनानें त्याला हें काम करतां येईल, पुस्तकें नीट वापरणें, आवश्यक तर टिपणें काढणें, ही कामें त्यानें कर्तव्यबुद्धीनें केली पाहिजेत वाचावयास

घेतलेलें पुस्तक निष्काळजीपणानें वापरणें, घेतलेली वृत्तपत्रें जागच्याजागीं न ठेवणें असल्या गोष्टी करूं नयेत. आपणाप्रमाणें इतरांनाही त्याचा उपयोग करणें आहे याची जाणीव वाचकानें ठेवावयास हवी. पुस्तकें तेथल्या तेथें वाचणें वा घरीं नेणें यापैकीं कोठलीही पद्धत असो, नीट तऱ्हेनें पुस्तकें वापरणें या गोष्टीकडे त्यानें लक्ष पुरविलें पाहिजे. वाचनालयाची सुव्यवस्था ही वाचकावरही अवलंबून आहे.

## इतर साधनें

याबरोबर आजच्या काळांत रेडियो, चित्रपट यांची मदत ज्ञानप्रसारासाठीं वाचनालयांना घेतां येण्यासारखी आहे. अज्ञ जनतेत ज्ञानप्रसार करण्यासाठीं अशा साधनांची अवश्य गरज लागणार आहे यासाठी पैशाची गरज लागेल. त्यासाठी धनिकांनीं पुढे आले पाहिजे. आजच्या युगांत देवाची जागा देशानें घेतली आहे. जुन्या काळीं देवालयें करीत असलेलें कार्य यापुढे ग्रंथालयांना करावयाचे आहे. महाराष्ट्राचे महागुरू समर्थ रामदास स्वामींनीं म्हटलं आहे कीं सद्गुरुवाचून देवाची प्राप्ती होत नाहीं, म्हणून आधी सद्गुरु शोधून काढावा तो शोध लावून देणारा गुरु ग्रंथावाचून आजच्या काळांत दुसरा कोणता असणार? आज देवाची जागा – जनार्दनाची जागा – जनतेनें घेतला आहे. त्या जनतेसाठी मंदीरें – वाचनमंदीरें – ग्रंथालयें – स्थापण्यासाठीं सरकार प्रयत्न करीत आहे. त्यासच धनिकांनीं हातभार लावावा.

थोडक्यांत सांगावयाचे तर ग्रंथालयांचें घटक म्हणून (१) ग्रंथ (२) ग्रंथपाल (३) फर्निचर वगैरे साधनें (४) वाचक आणि (५) पैसा ही जेथें योग्य तऱ्हेनें एकत्र येतात व ज्ञान प्रसाराचे कार्य करतात, अशा ग्रंथालयास आदर्श ग्रंथालय म्हणता येईल. साधनांना फार महत्त्व न देतां ज्ञानदानाचें ध्येय साध्य करणें हें आदर्श ग्रंथालयाचे कार्य म्हणतां येईल मुंबई प्रांतांतील ग्रंथालय चळवळीचे उत्पादक, पंतप्रधान, माननीय खेर यांच्या शद्बांत सागावयाचें तर स्वतंत्र भारतांतील ग्रंथालयें "जीवंत सांस्कृतिक केंद्रे बनलीं पाहिजेत." मुंबई जवळील खार येथील मोफत वाचनालय आणि ग्रंथालयाच्या इमारतीचा पाया घालतांना केलेल्या भाषणांत ते म्हणतात,— "भावी कालांत ग्रंथालयें हीं नुसतीं ग्रंथाचे संग्रह म्हणून राहणार नाहींत; तर तीं जीवंत सांस्कृतिक केंद्रे होतील. केवळ पुस्तकें पुरविण्याचे काम करून समाधान न मानतां अशा संस्थेकडून लोकाच्या गरजाना व मनोवृत्तीना पोषक होतील असे विविध वाङ्मयीन आणि सांस्कृतिक कार्यक्रम आंखले गेले पाहिजेत. अशा केंद्रांच्या ठिकाणीं भाषणें, प्रवचनें व चर्चा घडवून आणल्या पाहिजेत आणि जनतेच्या शिक्षणासाठीं चित्रपट, रेडियो या सारख्या आधुनिक शास्त्रीय साधनांचा उपयोग तेथें करून घेण्यात आला पाहिजे"

## सांस्कृतिक विकासाचें केंद्र

आदर्श ग्रंथालयाची यापेक्षां अधिक चांगली कल्पना मांडता येईल असे वाटत नाहीं. वरील गोष्टी ज्या ग्रंथालयांत असतील व घडतील तें ग्रंथालय आदर्श म्हणता येईल. द्रव्यबळ असेल त्या मानानें निरनिराळ्या भाषेंतील पुस्तकांचा संग्रह असणें उपयुक्त ठरेल. इंग्रजी, हिंदी आणि प्रांतिक भाषा यां व्यतिरिक्त इतर भाषांतील निवडक पुस्तकें ठेवतां आल्यास हवीत. कै. पूज्य सानेगुरुजींच्या प्रांत भारती वा आंतरभारतीं या योजनेला, तें पूरक होईल. व कोणाही ज्ञानपिपासूला, त्यांचा उपयोग करतां येईल. ज्या शहरांत व गांवांत वाचनालय असेल तेथील लोक-वस्तीच्या मानानें पुस्तकांची संख्या असावी. व्यापारी शहर असेल, कारखानें असतील तर त्या त्या विषयावरील निवडक ग्रंथसंग्रह अवश्य करावा. नगरपालिका, ग्रामपंचायती यांच्या सहकार्यानें ग्रंथालय जास्त उपयुक्त करणें अवघड नाहीं. भारताच्या निरनिराळ्या प्रांतातील परिस्थिती नीट आकलन होण्यासाठीं तेथील प्रमुख वृत्तपत्रें वा मासिकें घ्यावी. निरनिराळ्या प्रकारचे संदर्भग्रंथ थोडेसे कां होईना, अवश्य मिळवावेत बालविभाग, स्त्रीविभाग वगैरे विभाग द्रव्य असेल त्या मानानें ठेवावेत. प्रचलीत प्रश्नांवरील वाङ्मय ठेवल्यानें वाचकांस त्याबद्दल विचार करणें सुलभ जाईल आदर्श ग्रंथालयानें आपल्या ग्राहकांस अव्ययावत् ज्ञानाचा पुरवठा करण्याचे कार्य बजावले पाहिजे. दिवसांतून निदान एकदोन तास वाचनात घालवावें अशी ओढ नागरिकांना ग्रंथालयामुळें लागली पाहिजे. समाजाच्या सर्व घटकांना ज्या ठिकाणीं येऊन आपला ज्ञानविकास व सांस्कृतिक विकास करून घेतां येईल अशा ग्रंथालयास आदर्श ग्रंथालय म्हणतां येईल.

स्वतंत्र भारतांत अशा आदर्श वाचनालयांचे जाळे पसरिले पाहिजे. भारत खेड्यांचा बनलेला आहे. प्रत्येक खेड्यांत, ती फारच लहान असल्यानें वाचनालय स्थापणें शक्य होणार नाहीं. अशावेळीं एखाद्या प्रमुख गांवीं चांगलें वाचनालय सुरू करून आसपासच्या खेड्यांना पेट्यांतून पुस्तकें पोचविण्याची व्यवस्था झाली पाहिजे आदर्श अशा ग्रंथालयांत अशाप्रकारची योजनाही असली पाहिजे. असल्या योजनांवाचून एकादे ग्रंथालय ' आदर्श 'या नामाभिधानास पात्र होणार नाहीं.

मुंबई राज्यांत ग्रंथालय-प्रसारास सरकारचे सहाय्य मिळत आहे. जनतेनें त्याचा योग्य फायदा घेण्याचे ठरविल्यास, धनिकांनीं सढळ हातानें मदत केल्यास असली आदर्श ग्रंथालयें या आपल्या स्वातंत्र्याच्या काळांत जागोजाग स्थापन होणें मुळींच अशक्य नाहीं. धनिकांच्या दातृत्वगुणाचे योग्य चीज ग्रंथालयांना मदत करण्यानेंच होणार आहे असें म्हणणें आजच्या काळांत अतिशयोक्तीचे खास होणार नाहीं.

—जय हिंद—

परिशिष्ट

# कुलाबा जिल्हा वाचनालय संघ

अलिबागचे सार्वजनिक वाचनालय (आजचें जिल्हा ग्रंथालय) या संस्थेचा रौप्य–महोत्सव १९४६ सालीं विजयादशमीचे दिवशीं साजरा करण्यांत आला. वाचनालयाचे त्या वेळचे कार्यवाह श्री. कृ. के. राहाळकर (हे मुंबईच्या मराठी ग्रंथालय संघाचे कार्यकारी सभासदही होते) यांनीं, कुलाबा जिल्ह्यांतील ग्रंथालय कार्यकर्ते व वाचनालय-प्रेमी सद्‌गृहस्थ यांचा एक संघ स्थापन करावा अशी कल्पना मांडली. इतर सहकाऱ्यांस ती मान्य होऊन, रौप्य–महोत्सवाचे वेळींच पुण्याचे सुप्रसिद्ध ग्रंथालयशास्त्रज्ञ श्री. श. र. पारखी यांचे नेतृत्वाखालीं भरलेल्या ता. ६–१०–४६ च्या सभेंत संघाची स्थापना झाली जिल्ह्यांतील कार्यकर्ते या समारंभास उपस्थित होतेच, शिवाय मुंबईहून श्री. वा. वि भट, कोल्हटकर, धुपकर, सामंत वगैरे ग्रंथालय चळवळींतील कार्यकर्तेही आले होते त्यांचे व श्री. पारखी यांचे संघ स्थापनेस चांगलेच मार्गदर्शन झाले.

संघ स्थापन झाल्याबरोबर त्याच्या कार्यास सुरवात झाली. गोरेगांव येथील ज्ञान-विकास वाचनालय व संघ यांच्या सहकार्यानें गोरेगांव येथें १९४७ जानेवारींत पहिली जिल्हा वाचनालय परिषद श्री. अ का प्रियोळकर B. A. यांचे अध्यक्षतेखालीं पार पडली त्याचवेळीं जिल्हा साहित्यिक संघाचे अधिवेशनही 'सह्याद्रि'चे संपादक श्री. दि. वि. काळे M. A यांचे अध्यक्षतेखालीं पार पडलें (ही दोन्हीं अध्यक्षीय भाषणें या पुस्तकांत आली आहेत.) त्यानंतर १९४८ सालीं महाडचे करवा वाचनालय व संघ यांच्या सहकार्यानें दुसरी वाचनालय परिषद् महाड येथें प्राचार्य नवरे यांचे अध्यक्षतेखालीं झाली. तिसरी वाचनालय परिषद पेण येथील गांधी–मंदीर ग्रंथालय व संघ यांच्या सहकार्यानें मार्च १९५१ मध्यें मुंबई संस्थानचे ग्रंथालय वस्तुपाल श्री. वाकनीस B A F. L A यांचे अध्यक्षतेखालीं झालीं. गोरेगांव व पेण येथील परिषदांचे उद्‌घाटन आमदार नानासाहेब कुंटे यांनीं केले होते.

परिषदा भरविण्याबरोबरच जिल्ह्यातील ग्रंथालयांना सरकारी मान्यता व ग्रँट मिळविण्याबाबतही प्रयत्न सुरू झाले. पहिले कार्य म्हणजे अलिबागच्या सार्वजनिक वाचनालयास जिल्हा ग्रंथालय म्हणून मान्यता मिळवून देण्याचे होय. याबाबत संघाचे कार्यवाह श्री कृ. के. राहाळकर (हे त्यावेळीं सार्वजनिक वाचनालयाचे कार्यवाह होते) व अलिबागचे 'राष्ट्रतेज' चे संपादक श्री. ग भा पंडित यांची खटपट कारणीभूत झाली. या दोघांनी वेळोवेळीं तालुक्यांत फिरून व जिल्ह्यांतील अितर तालुका शहरास भेटी देऊन वाचनालयें स्थापन करणें व असतील त्याना सरकार मान्यता व मदत मिळण्याबद्दल मार्गदर्शन करणें हीं कामें मोठ्या उत्साहानें व जिव्हाळ्यानें केली.

श्री. राहाळकर हे जिल्हा ग्रंथालयाचे कार्याध्यक्ष असून महाराष्ट्र-ग्रंथालय-संघाचे कार्यकारी सभासद आहेत त्या संघाच्या निरनिराळ्या उपसमितींवरपण ते वेळोवेळी नियुक्त झाले आहेत; ग्रंथालयविषयक त्यांचे बरेचसे लिखाण प्रसिद्ध झाले आहे

अलिबाग तालुका वाचनालय संघही जिल्हा संघाच्या प्रोत्साहनानें स्थापन झाला आहे. आज जिल्ह्यात १ पेण २ पनवेल ३ गोरेगांव ४ रोहें ५ महाड ६ कर्जत ७ मुरुड ८ श्रीवर्धन ९ म्हसळे १० पोलादपूर ११ पाली १२ खालापूर १३ माथेरान या ठिकाणीं सरकारमान्य तालुका ग्रंथालयें कार्य करीत असून, उरण येथील वाचनालय लवकरच सरकारमान्य होईल अशी अपेक्षा आहे सरकारी शिक्षण खात्यामार्फत मान्यता व मदत मिळत असणारीं व इतर अशीं सुमारें ६० ग्राम-ग्रंथालये या जिल्ह्यांत आहेत. यापैकीं ७ उर्दू वाचनालयें आहेत त्यांची संख्या वाटण्याची शक्यता वाटत आहे.

जिल्हा संघातर्फें निरनिराळीं लहान लहान प्रकाशनें खेड्यांतील वाचनालयांच्या मार्गदर्शनासाठीं प्रसिद्ध करण्यांत आली तीं खालीलप्रमाणें—

१ खेड्यांतील वाचनालयांसाठीं घटनेचा नमुना.

२ साहित्य-दर्शिका (खेड्यांतील वाचनालयांना उपयुक्त अशा १५० पुस्तकांची यादी)

३ तालुका वाचनालय संघासाठीं घटनेचा नमुना.

४ जिल्हा संघाची घटना (प्रति शिल्लक नाहींत)

५ जिल्हा परिषदेची घटना ( " " )

साहित्य-दर्शिका, जमल्यास दर दोन महिन्यांनीं प्रसिद्ध करण्याची योजना आहे. कार्यकारी मंडळावर प्रत्येक तालुक्यांतील प्रतिनिधी घ्यावयाचे असतात संघ स्थापनेपासून श्री. कृ के राहाळकर हे कार्यवाह म्हणून कार्य करीत आहेत. सुरवातीपासून कार्याध्यक्ष म्हणून श्री वि. गो. फाटक, B A.Dip Lib मुंबई हे १९५१ पर्यंत काम करीत होते (हे ग्रंथालयशास्त्राचे पदवीधर असून याच जिल्ह्याचे रहिवासी आहेत) १९५१ पासून पेणच्या तालुका ग्रंथालयाचे कार्याध्यक्ष श्री. म द दोंदे, B A. S. T. C. हे संघाच्या कार्यकारी मंडळाचे कार्याध्यक्ष म्हणून काम पहात आहेत.

महाराष्ट्र-ग्रंथालय-संघाची जिल्हा शाखा म्हणून या जिल्हा संघाचे रुपांतर लवकरच होईल तें झाल्यावर सरकारी योजनेप्रमाणें संघास सरकारी मदत मिळेल महाराष्ट्रांत स्थापन झालेला व यथाशक्ति कार्य करीत असलेला हा पैहिलाच जिल्हा वाचनालय संघ आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं

श्री. ना. य. नेने पेण, हे संघाचे अध्यक्ष व श्री वि. गो. फाटक, B. A. Dip Lib हे उपाध्यक्ष आहेत सध्या संघाचे कार्यालय, सार्वजनिक वाचनालय, अलिबाग. येथें आहे

# कुलाबा जिल्हा वाचनालय संघ

## प्रकाशनें

१ खेड्यांतील वाचनालयांसाठीं घटनेचा नमुना

२ तालुका संघासाठीं घटनेचा नमुना

३ साहित्य दर्शिका (निवडक १५० पुस्तकांची यादी)

४ जिल्हा वाचनालय संघाची घटना

५ जिल्हा परिषदेची घटना

६ तालुका संघासाठीं पावतीं पुस्तकें

७ पंचामृत (ग्रंथालय विषयक व्याख्यानें व लेख)

—: कार्यालय :—

सार्वजनिक वाचनालय, अलिबाग.

